Regd. No. M H 1332

# नवभारत

या अंकात –



वर्ष २७
अंक दुसरा
नोव्हेंबर १९७३
रु. १–२५

अनुक्रमणिका











नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






अनुक्रमणिका

अनुक्रमणिका






प्राज्ञपाठशालामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष सत्ताविसावे
अंक दुसरा

# नवभारत

नोव्हेंबर
१९७३

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. बेडेकर—प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. मे. पुं. रेगे का. संपादक



वार्षिक रु. १२ अंकास रु. १·२५

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशालामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता :

१ संपादकीय : कार्यकारी संपादक, ' नवभारत ' मासिक,
प्राध्यापकांचे निवासस्थान
कीर्ति कॉलेज, दादर-मुंबई २८

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ' नवभारत ' मासिक,
C/o दी प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्, भीमरावबाडी, मुंबई २ फोन नं. ३५४८५४

# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | किंमत |
|---|---|
| १. धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | |
| साधी बांधणी | ८०.०० |
| कापडी बांधणी | १०४.०० |
| २. धर्मकोश - उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | |
| साधी बांधणी | १५०.०० |
| कापडी बांधणी | १८२.०० |
| ३. धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला | ४५.०० |
| कापडी बांधणी | ६३.०० |
| ४. मीमांसाकोश भाग १ ते ७ ( संपूर्ण ) | २५०.०० |
| ५. कौपीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश | ६.०० |
| ६. बौद्धागमार्थसंग्रहः | २०.०० |
| ७. वैदिक संस्कृतीचा विकास (सुधारून वाढविलेली आवृत्ती ) ( तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी ) | ३०.०० |
| ८. नवमानवतावाद | २.५० |
| ९. मानवाचा आदर्श | ३.०० |
| १०. चार्वाक – इतिहास आणि तत्त्वज्ञान ( प्रा. सदाशिव आठवले ) | ३.०० |
| ११. गीता-प्रवेश (डॉ. गो. वि. देवस्थळी ) | २.५० |
| १२. महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना (श्री. चा. अ. दाभोलकर ) | २.०० |
| १३. सिंधु संस्कृती, ऋग्वेद व हिंदु संस्कृती (श्री. प्र. रा. देशमुख ) | ४.०० |
| १४. इतिहासाचे तत्त्वज्ञान (प्रा. सदाशिव आठवले) | ६.०० |
| १५. लोकशाहीचे धोके (श्री. पन्नालाल सुराणा) | २.०० |
| १६. भारतीय स्त्रीधर्माचा आदर्श ( सौ. कमल पाध्ये ) | २.०० |

श्री. नी. र. वऱ्हाडपाण्डे

# सत्तावनचे स्वातंत्र्ययुद्ध आणि त्याचे निन्दक : २

निन्दकांचे आक्षेप सत्तावनचे युद्ध हे स्वातंत्र्ययुद्ध होते की नाही हे ठरविण्यास अप्रस्तुत असले तरी इतिहासदृष्ट्या साधार आहेत अशी काही वाचकांची समजूत असण्याचा संभव आहे. आजकाल सत्य इतिहास म्हणजे देशनिन्दक इतिहास वा इंग्रज इतिहासकारांची पोपटपंची असे समीकरण लोकप्रिय होत आहे. सावरकरांनी सत्तावनचे स्वातंत्र्यसमर लिहिले तो केवळ भावनेचा विलास आहे, मजुमदारांचे लिखाण मात्र वस्तुनिष्ठ, समतोल व साधार आहे असा एक ग्रह प्रचलित आहे. या ग्रहाचा बुडबुडा फोडणे आवश्यक आहे.

वस्तुतः सावरकरांच्या पुस्तकाप्रमाणेच मजुमदारांचे लिखाणही भावनाजन्यच आहे. पारतंत्र्याचा द्वेष व स्वातंत्र्यवीरांची पूजा ही भावना आहे; त्याचप्रमाणे पारतंत्र्याचे प्रेम व देशद्रोह्यांची पूजा यादेखील भावनाच आहेत. भावनांपासून कोणीही मुक्त नाही. प्रश्न एवढाच आहे की सत्यशोधनाच्या मार्गात देशभक्ती व देशद्रोह या भावनांपैकी कोणती कमी हानिकारक आहे. यावर कोणताही सुबुद्ध माणूस असेच म्हणेल की देशद्रोह ही एक अधम भावना आहे, उलट देशभक्ती ही उदात्त भावना आहे. सत्यनिष्ठा हा गुण अधम भावनेपेक्षा उदात्त भावनेच्या साहचर्याने राहणे अधिक संभवनीय आहे. प्रेम आंधळे असते हे खरे असले तरी काही एका मर्यादेपर्यंतच खरे आहे. आईचे मुलावर प्रेम असते म्हणून तिला त्याचा शेंबडेपणा गोजिरवाणा वाटेल. पण त्याच्यावर रोगाची छाया पडल्याचा संशय आल्याबरोबर योग्य ते उपचार करून त्याचा बचाव करण्याची ती शिकस्त करील, त्याच्या रोगाचे कौतुक करीत बसणार नाही. तसेच सत्तावनचे युद्ध व सत्तावनचे वीर यांच्या क्षुद्र उणीवांकडे सावरकरांनी दुर्लक्ष केले असेल व अभिमानास्पद भाग खुलवून मांडला असेल, पण हे युद्ध मुळातच राष्ट्रविघातक होते असा संशय येण्यासारखी परिस्थिती असती तर त्यांनी त्यावर एवढा स्फूर्तिदायक ग्रंथ कधीच लिहिला नसता.



अनुक्रमणिका





निन्दकांची-नीतिमत्ता

उलट प्रेमाप्रमाणेच द्वेष देखील आंधळा असतो. व स्वदेशाचा द्वेष ही भावना अधम असल्यामुळे त्या द्वेषाच्या साहचर्याने अप्रामाणिकपणासारख्या प्रवृत्ती रुजण्याचा अधिक संभव असतो. मजुमदार व फाटक यांच्या लिखाणात याचे प्रत्यन्तर मिळते. विष्णुभट गोडसेच्या "माझा प्रवास" या ग्रंथावरून तत्कालीन लोकांची सहानुभूती सत्तावनच्या युद्धाकडे नव्हती असे सिद्ध होते असे मजुमदारांनी म्हटले आहे. मजुमदारांनी हा ग्रंथ वाचला नाही हे यावरून स्पष्ट आहे. झाशीच्या वेढ्यात राणी लक्ष्मीबाईची सरशी होऊ नये, आणि काल्पी व कानपूर येथील लढायात पेशव्यांचा जय होऊन पेशवाईची पुनः स्थापना होऊ नये असे विष्णुभटाला वाटत होते असा आरोप करण्यास या पुस्तकात कुठेच जागा नाही. तेव्हा मजुमदारांनी न वाचलेला ग्रंथ वाचल्याची थाप मारण्याचा दांभिकपणा केला हे स्पष्ट आहे.

दांभिकपणापेक्षा अधिक निन्दनीय अशी एक वृत्ति मजुमदारांनी प्रकट केली आहे. व ती म्हणजे राष्ट्रपुरुषांवर जाणूनबुजून खोटे आरोप करण्याची. पृष्ठ ५६३ वर ते म्हणतात "... Nana perpetrated the horrible massacre of the British prisoners पुढे ५९७ वर हेच इतिहासज्ञ लिहितात "... there are no means to determine his" (Nana's) "personal share in them" म्हणजे कत्तलीची जबाबदारी नानासाहेबावर वैयक्तिक रीत्या येते असा पुरावा मजुमदाराजवळ नाही. असे असताना Nana perpetrated the massacre असे म्हणायला मजुमदारांना शरम वाटली नाही.

सत्तावनचे दुसरे निन्दक न. र. फाटक यांनी "माझा प्रवास" या विष्णुभट गोडसे यांच्या पुस्तकाचे संपादन करताना तात्या टोपेच्या सैन्याने लूटमार कशी केली याचे वर्णन करणाऱ्या हस्तलिखितातील एका उताऱ्याचे छायाचित्र छापले आहे. वस्तुतः ब्रिटिश फौजांनी किती भयंकर लूटमार व कत्तली केल्या याची वर्णने विष्णुभटाच्या पुस्तकात जागोजाग आहेत. त्यातला एखादा उतारा न देता हाच उतारा देऊन फाटकांनी वाचकांची बुद्धिपुरःसर दिशाभूल करण्याचा प्रयत्न केला आहे. तसेच तात्या टोपे झाशीवर १५००० सैन्य घेऊन आला असे फाटकांच्या आवृत्तीत विधान आहे. लहानपणी मराठी क्रमिक पुस्तकात याच पुस्तकातला एक उतारा वाचला. त्यात १०००० हा आकडा दिलेला आहे. यावरून विष्णुभटानी खरोखर कोणता आकडा दिला व फाटकांनी १५०००

कोठून आणले याचा खुलासा होणे आवश्यक आहे. वैद्यांचे हस्तलिखित निराळे असावे असा फाटकांचा एक तर्क आहे पण त्याला प्रमाण नाही. वैद्य व फाटक यात कोणताही वाचक वैद्यांनाच जास्त विश्वसनीय मानील यात संशय नाही. फाटकांचा कुत्सितपणा याहीपेक्षा अधिक निंद्य रीतीने राणी लक्ष्मीबाईच्या बाबतीत प्रकट झाला आहे. " शिकारीच्या शोकामुळे " राणीची " गैरवाजवी वागणूक होत नसे " असे विष्णूभटाचे वाक्य आहे. फाटकांनी नसेच्या जागी असे होते काय अशी शंका प्रकट करून सूर्यावर थुंकण्याचा प्रयत्न केला आहे. सत्तावनच्या निन्दकांची नीतिमत्ता कोणत्या दर्जाची आहे हे यावरून स्पष्ट होते.

सत्तावनच्या निन्दकांचे लिखाण साधार आहे असे समजणाऱ्यांनी सावरकर व मजुमदार यांचे या विषयावरील लिखाण ताडून पहावे. जी घटना घडल्याबद्दल कुठेही आधार सापडत नाही अशी एखादी घटना घडल्याचे सावरकरांनी वर्णन केले आहे असा आक्षेप कुणालाही घेता येणार नाही. त्यांनी आपल्या विधानांना जागोजाग आधार दिले आहेत. मजुमदारांनी यापेक्षा अधिक काही केले आहे असे नाही. उलट मजुमदार सरळ थापा मारतात तशा थापा सावरकरांनी कुठेही मारलेल्या नाहीत.

निन्दकांचे आक्षेप अप्रस्तुत आहेत एवढेच केवळ नव्हे तर हवेतल्या वावड्याव्यतिरिक्त त्यात काही ऐतिहासिकता नाही हे दाखवून देण्यासाठी आता त्यांचा क्रमशः विचार करू.

## स्वराज्य आणि परराज्य

पहिला आक्षेप म्हणजे ब्रिटिशपूर्व स्वराज्यापेक्षा ब्रिटिश परराज्य अधिक प्रगत होते. या मुद्द्याची विस्तृत चर्चा येथे करणे शक्य नाही. पण आर्थिक उत्पादनशीलता, साक्षरतेचे प्रमाण, वैज्ञानिक व तांत्रिक प्रगती या सर्वच बाबतीत ब्रिटिशपूर्व भारताची स्थिती ब्रिटिश भारतापेक्षा अधिक समाधानकारक होती याबद्दल निर्विवाद पुरावे उपलब्ध आहेत एवढेच येथे नमूद करणे आवश्यक आहे.

दिल्लीच्या नागरिकांनी १८५७ साली एक पत्रक काढले, त्यावरून इंग्रजी राज्याविरुद्ध असंतोष किती सार्वत्रिक होता हे दिसून येते. इंग्रजांनी आगगाड्या आणल्या, इंग्रजी शिक्षण आणले, म्हणून इंग्रजी पारतंत्र्याचे गोडवे गाण्याची आज फॅशन आहे. पण ज्या लोकांनी इंग्रजपूर्व भारतीय राज्ये पाहिली होती अशा सत्तावनच्या भारतीयांना पूर्वीच्या राज्यांच्या तुलनेने इंग्रजी राज्यात काहीच चांगले दिसत नव्हते असे हेन्री लॉरेन्सने लॉर्ड कॅनिंगला लिहिलेल्या पत्रावरून

स्पष्ट होते. क्षुद्र सरकारी नोकऱ्यात काही लोक गुंतले होते. पण असंख्य लोक बेकार झाले होते. लखनौचा कादरअली याने ब्रिटिश राज्यात : १) धर्म २) प्रतिष्ठा ३) जीवन व ४) मालमत्ता या चार गोष्टी सुरक्षित नाहीत, पूर्वीच्या राज्यात त्या सुरक्षित असत असे आपल्या पत्रकात म्हटले आहे. ज्या ब्रिटिश न्यायपद्धतीचा आंग्लशिक्षित बराच बडिवार माजवितात तिच्यात काही न्याय आहे असा १८५७ सालच्या भारतीयांचा अनुभव नव्हता. पूर्वीच्या न्यायपद्धतीत कोणताही माणूस दाद मागण्यास सरळ न्यायाधीशासमोर उभा राहू शकत असे. पण ब्रिटिश न्यायपद्धतीत न्यायाधीशापर्यंत पोचणे हेच एक मोठे दिव्य होते. वकीलांच्या व न्यायालयांच्या लठ्ठ दक्षिणा दिल्याशिवाय पानही हालत नसे. हे सर्वसाधारण माणसाच्या आटोक्याबाहेरचे होते. शिवाय लाचलुचपतीचा रोग इतका सार्वत्रिक होता की न्यायदेवता ही पैशाची बटिक बनली होती.

## भ्रान्त विचार

स्वराज्य व परराज्य यांच्या तौलनिक मूल्यमापनाबद्दल सत्तावनच्या निन्दकांच्या मनात किती गोंधळ आहे याचे उदाहरण म्हणून मजुमदारांचे लिखाण उल्लेखनीय आहे. त्यांच्या मते ब्रिटिश राज्यामुळे भारतात एकराष्ट्रीयत्व स्थापन होऊन बौद्धिक पुनरुज्जीवन घडून आले. मग असे जर आहे तर मजुमदारांनी भारताचे एवढे भले करणाऱ्या ब्रिटिश राज्याविरुद्ध झालेल्या सर्वच चळवळींचा धिक्कार करायला पाहिजे होता. फक्त सत्तावनच्या उठावाचीच निन्दा करून त्यांचे भागायला नको होते. पण उलट त्यांनी सुमारे पन्नास वर्षाच्या स्वातंत्र्याच्या चळवळीला हजारच्या जवळपास पृष्ठे वाहिली आहेत. त्यांना या चळवळीबद्दल बराच आदर आहे. या आदराचे त्यांनी कोठेच समर्थन केले नाही. स्वातंत्र्याची चळवळ सुरू होण्याच्या सुमारासच ब्रिटिश राज्याची हितकारकता येऊ लागली होती व ते नष्ट करून स्वराज्य स्थापल्याने भारताचे हित होणारे होते असे त्यांनी कोठेही सिद्ध केले नाही, व आपले विचार तर्कशुद्ध ठरण्यास हे सिद्ध करणे जरूर आहे याची त्यांना जाणीवही नाही.

वस्तुतः स्वराज्यापेक्षा परराज्य चांगले असू शकते असे मानले तर स्वातंत्र्याच्या चळवळीचीच केवळ नव्हे तर राष्ट्रीय रक्षाखात्याचीच समर्थनीयता नाहीशी होते. उद्या पाकिस्तानने वा चीनने भारत व्यापला तर दुसरे पुनरुज्जीवन होणार नाही कशावरून ? पुनरुज्जीवन होणार नाही व पारतंत्र्य

हितावह ठरणार नाही हे निश्चित नाही, पाक व चीनी आक्रमणांना तोंड देण्याने जीवहानी व वित्तहानी होणार हे मात्र निश्चित आहे. मग संरक्षण-खात्यावर कोटचवधीचा खर्च कशाला ? पाकला व चीनला भारत का व्यापू देऊ नये ? या प्रश्नाला मजुमदार व त्यांचे सहप्रवासी यांच्या जवळ काय उत्तर आहे ?

मजुमदारांच्या मेन्दूत किती सावळागोंधळ आहे याचा प्रत्यय सत्तावनच्या उठावाच्या मागे काही योजना नव्हती हे सिद्ध करण्यास ते जी प्रमाणे देतात त्यावरून देखील कसा येतो हे पुढील विवेचनावरून दिसून येईल.

## सीतारामबाबाची साक्ष

सीतारामबाबाने आपल्या साक्षीत सांगितले की १८५४ पासून नानासाहेब साऱ्या राजेरजवाडयांना पत्रे लिहून उठावाची योजना आखीत होते. या योजनेस फक्त त्रावणकोरच्या राजाची सहानुभूती नव्हती. औध खालसा झाल्यावर नानांना पत्रावर पत्रे येऊ लागली. जम्मूच्या गुलाबसिंगाने शस्त्रास्त्रे, सैनिक व धन गोळा केले. काही धन एका लखनौच्या सावकारामार्फत नानासाहेबास पाठवले देखील.

ही साक्ष खरी असेल वा खोटी असेल, पण ती खोटीच आहे हे सिद्ध करण्यासाठी मजुमदार जे प्रमाण देतात ते हास्यास्पद आहे. ते म्हणतात " ज्या राजेरजवाडयांना नानांनी पत्रे लिहिली त्यात बायजाबाई शिंदे यांचे देखील नाव आहे. या बायजाबाई स्वातंत्र्ययुद्धात कधीच सामील झाल्या नाहीत; उलट त्यांनी ब्रिटिशांशी आपल्या देशबांधवांविरुद्ध सहकार्य केले. यावरून असा निष्कर्ष निघतो की नानांनी बायजाबाईशी युद्धाच्या योजनेबद्दल वाटाघाट केली नव्हती " आहे की नाही इतिहासकार ! क्रान्तीच्या योजनेची वाटाघाट ज्यांच्याशी होते ते सगळेच क्रांतीत भाग घेतात काय ? " बायजाबाईच्या चारित्र्यावरून असे दिसते की तिच्याकडे नानांचे पत्र आल्याबरोबर तिने नानांच्या कारस्थानाचा गौप्यस्फोट केला असता " असे कदाचित मजुमदारांना म्हणावयाचे असेल. पण मजुमदारांच्या वतीने अशी सारवासारव करायची सोय नाही. कारण बायजाबाईला युद्धात भाग घेण्याची इच्छा नसली तरी नानांच्या कारस्थानाने ब्रिटिशांचे परस्पर उच्चाटन झाले तर तिला हवेच होते म्हणून तिने नानांची चुगली केली नाही असाही तिच्या वर्तनाचा अर्थ लागू शकतो.

भारतातल्या सर्व राजेरजवाडयाशी नानांने संधान बांधले तरी त्याचा पुरावा पुढे कसा सापडला नाही असा मजुमदार निर्बुद्धपणे प्रश्न विचारतात !

सारा बनाव फसल्यावर नानांनी आपल्याशी संधान बांधले होते असे कुणी कबूल करील अशी मजुमदारांची अपेक्षा आहे काय ? शिवाय नानांनी संधान बांधून देखील जे राजेरजवाडे स्वातंत्र्ययुद्धात सामील झाले नाहीत त्यांनी नानांची वेळीच आगळिक केली नाही एवढयाच सिद्ध न करता येण्यासारख्या अपराधाखातर त्यांच्यावर धार धरायची शहाण्या इंग्रज राज्यकर्त्यांना जरूर वाटली नाही हेही सहज समजण्यासारखे आहे.

नानासाहेबांनी बुद्धिपुरःसर स्वातंत्र्ययुद्धाचा व्यूह रचला असे सांगून त्यांना स्वातंत्र्यवीर ठरविण्याची संधी साधायची सोडून "शिपायांनी आग पाडल्यामुळे नानासाहेब युद्धात सामील झाले" असे तात्या टोपेने सांगितले यावरून या युद्धामागे नानांची काहीच योजना नव्हती असे अनुमान मजुमदार काढतात ! मजुमदारांच्या तर्कशास्त्राची कमाल आहे ! तात्या टोपेच्या काळी ब्रिटिशांच्या विरुद्ध योजनाबद्ध उठाव करणे हे जनतेला पूजार्ह वाटण्यासारखे कृत्य होते हे या युक्तिवादात मजुमदार कबूल करतात. मग उठावाला जनतेची सहानुभूती नव्हती या त्यांच्या पालुपदाचे काय ? शिवाय नानांना स्वातंत्र्यवीर म्हणून कीर्ती मिळवून द्यावी, मग त्यापायी ते फाशी गेले तरी चालेल अशी तात्या टोपेची मनीषा असती तर यदृच्छया घडून आलेला उठावदेखील नानानेच घडवून आणला असे खोटे सांगून नानांना फुकटचे श्रेय देण्याचा प्रयत्न त्याने का केला नाही ?

कये आपल्या Indian Mutiny मध्ये म्हणतो की "एकमेकांशी काहीच संबंध नसलेल्या शेकडो साक्षीदारांच्या साक्षीवरून बंडाचा व्यूह नानाचेच रचला होता याबद्दल माझ्या मनात तिळमात्र शंका नाही." रसेल आपल्या डायरीत लिहितो की नाना व त्याचा हस्तक अजीमुल्ला हे बंडाचा उद्रेक होण्याच्या आधी यात्रेच्या निमित्ताने ट्रंक रोडवरील बहुतेक लष्करी ठाण्यांना भेटी देऊन आले होते." एक हिंदू व एक मुसलमान यांच्या या संयुक्त यात्रेचा अन्वयार्थ "बंडाचे" कारस्थान या एकाच वर्णनाने लागू शकतो.

## राणी लक्ष्मीबाईचा कार्यभाग

राणी लक्ष्मीबाईने पुरीमध्ये राहणाऱ्या आपल्या कुलपुरोहिताला मार्च १८५६ मध्ये एक पत्र लिहिले. त्यावरून राणी इंग्रजांविरुद्ध "बंडाची' उभारणी करीत होती असे दिसते. हे पत्र खरे नाही हे सिद्ध करण्यास डॉ. सेन पुढील कारणे देतात : (१) राणीच्या इतर पत्रात मुसलमानी तारखा आहेत, या पत्रात

इंग्रजी तारीख आहे. ( २ ) “माननीय पण्डाजी” व “आपली लक्ष्मीबाई” हे शब्दप्रयोग त्यावेळेच्या रिवाजास धरून नाहीत. ( ३ ) पत्रावरील मुद्रा इतर पत्रावरील मुद्रेसारखी नाही. ( ४ ) पत्रात चर्बीच्या काडतुसांचा उल्लेख आहे पण ही काडतुसे भारतात नोव्हेंबर १८५६ च्या आधी आली नव्हती.

याविरुद्ध असे म्हणता येईल की (१) मुसलमानी तारखा जाऊन इंग्रजी तारखा रूढ होण्याचा तो संक्रमणाचा काळ असल्यामुळे काही पत्रावर मुसलमानी तारखा व काही वर इंग्रजी तारखा वापरल्या गेल्या हे सहज शक्य आहे. (२) “माननीय पंडाजी” व “आपली लक्ष्मीबाई” हे लेखन देखील इंग्रजी पद्धतीची छाप पडत असल्याचे द्योतक असेल. ( ३ ) राजेलोक जन्मभर एकच मुद्रा वापरीत असतील हे शक्य नाही. मुद्रा घासून पुसून खराब होतात म्हणून नव्या कराव्या लागतात. नव्या करताना नेहमीच जुन्याची हुबेहुब नक्कल केली जात असेल असे नाही. आपल्या दर्जात पडलेल्या फरकानुसार मुद्रेतही फरक करणे त्यांना भाग होते. (४) चर्बीची काडतुसे नोव्हेंबर ५६ च्या आधी आली नाहीत असे सेन कशाच्या आधारावर म्हणतात हे ते सांगत नाहीत. डिसेंबर १८५३ मध्ये कर्नल टकरने आपल्या एका प्रतिवृत्तात अशा काडतुसांचा उल्लेख केला गेला होता असे कयेच्या इंडियन म्युटिनी मध्ये विधान आहे. सावरकरांनी याची दखल घेतली आहे. पण व्यावसायिक इतिहासकार म्हणून गाजलेल्या सेनाना याचा पत्ताही नाही. भावनावश म्हणून मानला गेलेला सावरकरांसारखा लेखक साधार विधान करतो, उलट निःपक्षपाती इतिहास लिहिण्याचा दावा करणारे सेन मजुमदार प्रभृति ठोकून देतात याचे हे उत्तम उदाहरण आहे.

पत्र एखाद्या इंग्रजी जाणणाऱ्या माणसाने बनावट तयार केले असे सेन म्हणतात. असे पत्र बनावट तयार करण्यात त्याचा हेतु काय असावा याविषयी ते काहीच खुलासा करीत नाहीत. राणीच्या एखाद्या हितशत्रूने तिला फासावर चढविण्यासाठी हा खोटा पुरावा तयार केला म्हणावे तर ती आधीच सूर्यमंडळ भेदून अशा अधमांच्या कारवायापलीकडे गेली होती.

पत्र राणीचेच असे मानले तरी ते अस्सल पत्रासारखे भासत नाही याची सरळ उपपत्ती देता येते. पत्र शत्रूच्या हाती लागले तर ते “माझे नव्हे” म्हणून सरळ कानावर हात ठेवता यावे म्हणून बुद्ध्याच त्यात कमअस्सलपणाचे पुरावे ठेवले असतील.

अनुक्रमणिका

मजुमदार विरुद्ध इंग्रजी अधिकारी

झाशीची राणी युद्धात का सामील झाली याची कारणे सांगताना मजुमदार म्हणतात की "बंडाशी" आपला संबंध नाही असे राणीने अनेक वेळा सांगूनही इंग्रजांचा त्यावर विश्वास बसला नाही, एवढेच नव्हे तर राणीला फासावर चढविण्याचा त्यांनी निश्चय केला होता. एवीतेवी मरण अटळ आहे तेव्हा धारातीर्थी देह ठेवावा म्हणून राणी युद्धात सामील झाली.

पण काहीच कारण नसताना राणीचा युद्धात हात होता अशी ठाम समजूत करून घेण्याचे इंग्रजांना काय कारण होते याचा खुलासा मजुमदार करीत नाहीत. चित्रकूटचे नारायणराव व माधवराव पेशवे युद्धाशी संबंध नसल्यामुळे आपण होऊन इंग्रजांच्या स्वाधीन झाले तसेच राणीचा युद्धाशी संबंध नसता तर तिलाही निर्धास्तपणे इंग्रजांच्या स्वाधीन होण्यास हरकत नव्हती. ("Narayanrao & Madhavrao declared themselves as Peshwas हे मजुमदारांचे विधान, हे दोघे युद्धाशी संबंध नसल्यामुळे निःशंकपणे इंग्रजांच्या स्वाधीन झाले या विष्णुभटाच्या विधानावरून खोटे दिसते. मजुमदार आपल्या विधानास आधार देत नाहीत) राजा कुमारसिंग "बंडाची" तयारी करीत आहे अशा अनेक तक्रारी इंग्रजाकडे पोचल्या तेव्हा त्यांनी त्याची चौकशी केली व चौकशीत काहीच सापडले नाही म्हणून कुमारसिंगाविरुद्ध त्यांनी काहीच कारवाई केली नाही. मग झाशीच्या राणीच्या बाबतीतच निष्कारण दुराग्रह व डूख इंग्रजांनी का बाळगावा ? इंग्रजांनी राणीला मारण्याचा निश्चय केला होता हे मजुमदारांचे म्हणणे खरे असेल तर राणीचा आधीपासूनच युद्धात भाग होता याबद्दल त्यांच्याजवळ पुरावा असला पाहिजे. तत्कालीन इंग्रज अधिकाऱ्यांचे मत चुकीचे होते असे ठासून म्हणण्यास मजुमदार काहीच पुरावा देत नाहीत.

याबाबतीतील पुराव्याचा एक दुवा त्यांनी अज्ञानाने म्हणा वा बुद्धि-पुरःसर म्हणा दडवून ठेवला आहे. राणीच्या नोकरीत असलेला लक्ष्मणराव नावाचा एक ब्राह्मण उठावाचे कारस्थान करीत आहे असे दर्शविणारी काही पत्रे ब्रिटिश कमिशनरच्या हाती लागली. राणीची फूस नसताना लक्ष्म-णरावासारखा एखादा नोकर युद्धाचा व्यूह रचील हे इंग्रजांना संभवनीय वाटले नाही. म्हणून राणीवर संशय घेतला. पुढे चौकशी झाली असती तर राणीचा हात किती गुंतला आहे हे लपून राहणे कठीण होते. पण इंग्रजांच्या हातात

पत्रे लागल्याबरोबर त्याच्या आधारावर पुढे काही करण्याची त्यांना उसंत न देता क्रांतिकारकांनी उठाव केला व इंग्रजांची कत्तल केली.

## राजा कुमारसिंग

नानासाहेब पेशवे व राणी लक्ष्मीबाई यांच्याबरोबरच ज्याचे नाव सत्तावनच्या संग्रामात महत्त्वाचे आहे त्या राजा कुमारसिंगाचा युद्धाच्या पूर्व-योजनेत काय भाग होता याबद्दल जे. जे. हाल म्हणतो की १८४५ पासूनच कुमारसिंग ब्रिटिशांविरुद्ध कारस्थाने करीत होता. १८४६ साली पाटण्या-मध्ये एक ब्रिटिशविरोधी कट झाला त्यात कुमारसिंगचा हात होता. इतर ब्रिटिश अधिकाऱ्यांनी देखील कुमारसिंग आपल्या रयतेस " तयार रहा मी केव्हाही बोलावीन " असे आदेश, देत असे. त्याने शस्त्रास्त्रे व सैनिक गोळा केले होते, दानापुरच्या शिपायांनी त्याला आपला राजा निवडले आहे, शोण नद पार करण्यासाठी त्याने शिपायांना नावा पुरविल्या आहेत, वगैरे प्रतिवृत्ते वरिष्ठांना कळविली होती. बेक म्हणतो " कमिशनरच्या कार्यालयात एक अनामिक अर्ज आहे. त्यात कुमारसिंगाच्या साऱ्या हालचालींची तक्रार आहे एवढेच नव्हे तर २५ जुलैला तो उठाव करणार असेदेखील लिहिले आहे. या अर्जातले अक्षरन् अक्षर खरे ठरले आहे. त्याकडे दुर्लक्ष करण्यात फारच मूर्खपणा झाला. "

एवढा निर्णायक पुरावा उपलब्ध असून देखील मजुमदार म्हणतात की जास्त चौकशीमध्ये कुमारसिंगाविरुद्धचे आरोप सिद्ध होऊ शकले नाहीत; त्याअर्थी कुमारसिंगाबद्दलची ही सारी प्रतिवृत्ते अफवेच्या स्वरूपाची असली पाहिजेत ! खरेच आहे. इंग्रज हे देवयोनीतले ! त्यांनी चौकशी केल्यावर कुमारसिंगाचे गुपित गुप्त राहील हे शक्यच नाही. कुमारसिंगासारख्या " काला आदमीने " इंग्रजांच्या दक्षतेवर कडी केली असणे शक्यच नाही. आपल्याला इषारे मिळूनही कुमारसिंगाने आपल्यावर मात केली म्हणून बेकसारख्या इंग्रजाला हळहळ वाटते. पण मजुमदारासारख्या इंग्रजभक्तांचा मात्र इंग्रजी हेरखात्यावर बालंबाल विश्वास आहे. उन्हापेक्षा वाळू जास्त तापट असते हेच खरे.

## चपात्यांचे रहस्य

१८५७ च्या सुरवातीस खेड्यापाड्यातून देखील चपात्या वाटण्यात आल्या. कुणीतरी खेड्यात दोन चपात्या घेऊन येई, व तशाच दहा चपात्या करून, आणखी पाच खेड्यात प्रत्येकी दोन दोन वाटण्यास सांगे. अशा रीतीने

थोड्याच अवधीत भारताच्या बऱ्याच मोठ्या भागात चपात्या वाटण्यात आल्या. सीताराम बाबाच्या सांगण्याप्रमाणे स्वातंत्र्ययुद्धाच्या नौबती–झडणार याचा हा संकेत होता. मजुमदार म्हणतात की, चपात्या रोगनिवारणासाठी व लोकांना ख्रिस्ती बनविण्यासाठी इंग्रजांनीच वाटविल्या असे काही साक्षीदारांनी ऐकल्याचे सांगितले. यावरून चपात्यांचा स्वातंत्र्ययुद्धाशी काहीच संबंध नव्हता हे सिद्ध होते.

असे काही सिद्ध करणे हा तर मजुमदारांच्या हातचा मळ आहे. मजुमदारांना एवढाही विवेक नाही की "चपात्या आम्हाला मिळाल्या व ती स्वातंत्र्ययुद्धाची नौबत होती हेही आम्हाला माहीत होते पण आम्ही अधिकाऱ्यांना ही गोष्ट वेळीच कळविली नाही" असे कबूल करणे म्हणजे आपण त्या युद्धात सामील होतो असे कबूल करण्यासारखे होते. साराच बेत फसल्यावर असे कबूल करणे हा निर्बुद्धपणाच झाला असता.

वेलोरच्या बंडाच्या आधी देखील अशाच चपात्या वाटण्यात आल्या होत्या, यावरून अशा तऱ्हेने उठावाचे संदेश पोचविण्याचा प्रघात होता असे म्हणण्यास आधार आहे.

## धार की धारा ?

बरेच मुरके मारल्यावर मजुमदार हे कबूल करतात की राजेरजवाड्यांनी कारस्थान केले नसले तरी शिपायांनी कारस्थान केले असले पाहिजे, नाहीतर एकदोन महिन्यात एवढ्या मोठ्या प्रदेशावर उठाव झाला नसता. अहरानुल्लाने आपल्या साक्षीत सांगितले की शिपायात सतत पत्रव्यवहार सुरू होता व उठावाचा बनाव बनत होता.

पण यावर देखील मजुमदारांची मल्लिनाथी अशी की बनाव बनत होता पण बनला नव्हता. तरवारीला धार होती धारा नव्हती अशासारखाच शब्दच्छल आहे. योजना पूर्ण होण्याच्या आधीच उठाव झाला की ठरलेली योजना न पाळता उठाव झाला यात एवढा कोणता महत्त्वाचा भेद आहे ?

उठावाची योजना आखताना भारताबाहेरील सत्तांची मदत मिळविण्याचा प्रयत्न झाला की नाही असाही एक प्रश्न उद्भवतो. याबद्दल सेनांनी पुढील गोष्टी कबूल केल्या आहेत : (१) मुकुंदलाल नावाच्या साक्षीदाराने सांगितले की शिद्दी कम्बर नावाचा एक माणूस बहादूरशहाने इराणच्या बादशहाकडे वाटाघाटीसाठी पाठवला. (२) हकीम अहरानुल्लाच्या म्हणण्याप्रमाणे







मिर्झा–हैदराने ( बहादूरशहाला ? ) शिया होऊन इराणच्या शहाशी दोस्ती जोडण्याचा सल्ला दिला. ( ३ ) मेजर हेरियटने सांगितले की इराणच्या शहाने भारताच्या कोणत्या प्रान्तावर कुणाला सुभेदार नेमायचे हेही ठरवून ठेवले होते. ( ४ ) भारतातून इराककडे पत्रे गेली तशीच इराणातूनही "वण्डास" प्रोत्साहन देणारी पत्रे भारतात आली होती.

एवढे असूनही पुढे इराणकडून स्वातंत्र्ययुद्धाला एकाही कवडीची वा शिपायाची मदत मिळाली नाही यावरून, व पत्रे पाठवली गेली पण त्यांची उत्तरे आल्याचा पुरावा सापडत नाही म्हणून सेन योजनेची शक्यता दूर सारतात. पण यावरून असे म्हणणे अधिक सयुक्तिक आहे की योजना शिजत होत्या पण त्यांना निश्चित आकार येण्याच्या आधीच उठाव होऊन सर्वच लागेबांधे विसकटले. पूर्ण ठरलेल्या योजना देखील काटेकोरपणे पार पाडणे एखाद्या प्रस्थापित सरकारला देखील जमत नाही. ६५ च्या भारत पाक युद्धाचे सारे धुरीण हयात आहेत. खण्डोगणती तत्कालीन वर्तमानपत्रांचा पुरावा उपलब्ध आहे, असे असून देखील भारताला लाहोर घ्यायचे होते की नाही, व भारताने शस्त्रन्यास का मान्य केला याबद्दल वाद होतो. मग ज्यांना पाठ टेकायला आपली म्हणता येईल अशी तसूभर भूमी देखील उरलेली नव्हती असे शिपायी व भारतीय राज्यकर्ते यांच्या गुप्त योजना प्रत्यक्षात असबंद्ध रीतीने प्रकट झाल्या तर त्यात आश्चर्य काय ?

## अकाली समेट

मीरतला उठाव केल्यावर दिल्लीकडे जायचे हे आधी ठरले नव्हते; उठावानंतर चर्चा करून ते ठरविण्यात आले असे मजुमदार म्हणतात. हे खरे मानले तरी युद्धामागे योजना नव्हती असे त्यावरून सिद्ध होत नाही. ३१ मेला उठाव करण्याच्या योजनेप्रमाणे ( Whites History a J. C. Wilson's official narrative) मीरतच्या शिपायांनी दिल्लीला जायचे असे ठरले नव्हते. हिंदुस्थानभर एकाच वेळी उठाव करून आपापल्या जागीच परराज्य नष्ट करायचे असे ठरले होते. साऱ्या भारतातली ब्रिटिश सत्ता नष्ट झाल्यावर दिल्लीतून लगेच बहादूरशहाच्या नावाने द्वाही फिरविण्याची योजना असेल. २१ दिवस आधीच फक्त मीरतमध्ये उठाव केल्यावर मीरतमध्येच स्वस्थ बसल्याने सार्वत्रिक उठाव घडवून आणणे शक्य नव्हते. त्यासाठी .दिल्लीची द्वाही फिरणे आवश्यक होते. म्हणून शिपायां ी दिल्लीकडे जाण्याचा निर्णय

अनुक्रमणिका

घेतला. काहीच पूर्वयोजना नसताना अचानक उठाव झाला असता तर आपण दिल्लीला पोचल्यावर दिल्लीचे शिपायी आपल्याला मिळतील अशी खात्री वा आशादेखील बाळगण्यास शिपायांना काहीच आधार नव्हता. व ज्या ठिकाणी सुसज्ज सरकारी फौज आहे अशा दिल्लीसारख्या ठिकाणी जाऊन आपण होऊन सरकारच्या तावडीत सापडण्याचा मूर्खपणा शिपायांनी कदापि केला नसता. दिल्लीचे शिपायी आपल्याला मिळतील ही आधीपासूनच खात्री असल्यामुळे शिपायांनी दिल्लीवर मोर्चा वळविला.

उठाव दडपून टाकण्यात आल्यावर त्याच्यामागचे सूत्रधार कोण याचा छडा लावण्याचा प्रयत्न करण्यात आला. तेव्हाच्या अनेक घटना दूरगामी योजना करण्यात आल्या होत्या असेच निःसंदेहपणे दाखवितात. कोल्हापुरच्या युद्धात पकडलेल्या एका नेत्याने पकडले जात असतानाच पुराव्याचे पत्र फाडून टाकले व खाल्ले. जेकब लिहितो की तोफेच्या तोंडी दिलेला एक योद्धा पहिल्या गोळ्याने मेला नाही तेव्हा "आता तरी नावे सांग, तुला जिते सोडतो" असे मी म्हणालो तेव्हा माझ्याकडे तुच्छतेने पाहून म्हणाला "मी केले ते केले" व नावे न सांगता दुसऱ्या गोळ्याच्या स्वागतास सज्ज झाला " तोफेच्या तोंडी बांधले असताना दुसऱ्या एकाने एक नाव उच्चारले तेव्हा तेथे हजर असलेला एक सरकारी नोकर ज्याचे नाव उच्चारले गेले त्याला खबर देण्यास तेथून निसटला व तो संशयित पसार झाला. या व अशा शेकडो उदाहरणावरून उठावाच्या आधी बराच पत्रव्यवहार व कारस्थाने सुरू होती हे स्पष्ट आहे. स्वातंत्र्य योद्धयांना देशभरातील साऱ्या बातम्या अचूक व द्रुतगतीने मिळत हेदेखील योजनाबद्धतेचे लक्षण आहे.



श्री. वा. रं. सुंठणकर

टॉयन्बीकृत-

# पाश्चिमी राष्ट्रांच्या आशियातील साम्राज्य विस्ताराची मीमांसा

( उत्तरार्ध )

## दुसरी लाट- सर्वदूर साम्राज्यविस्तार

स्पॅनिश आणि पोर्तुगीज लोकानंतर डच, फरेंच आणि ब्रिटिश हे साम्राज्यविस्ताराच्या स्पर्धेमध्ये उतरले. पोर्तुगीजांप्रमाणेच त्यांनी आशिया खंडातील विविध देशांच्या किनाऱ्यावर बस्तान बसविण्यास सुरुवात केली. डचाना मिळाले ते प्रदेश प्रथम पोर्तुगीजांनीच अंकित केले होते. १६४१ मध्ये त्यांनी मलाक्का घेतले ते पोर्तुगीजांनीच प्रथम हस्तगत केले होते. १६३८ ते ५८ या दरम्यान त्यांनी पोर्तुगीजांकडून सीलोनचा किनाराप्रदेश घेतला. इंग्रजांना पोर्तुगीजाकडून जी मुंबई मिळाली ती दुसऱ्या चार्लस्‌ला लग्नादाखल भेट म्हणूनच होती. पोर्तुगालचे प्रदेश जसे डचांनी हस्तगत केले पण पुढे इंग्रजांनी डचांच्या वसाहतीवर धाड घातली. १७९५ ते १८१४ च्या दरम्यान हॉलंड फरेंच साम्राज्याला जोडण्यात आले होते. या संधीचा फायदा घेऊन इंग्रजानी डचानी हस्तगत केलेलें प्रदेश जिंकून घेतले. डचाकडून मलाया, द्वीपकल्प आणि सीलोन ही त्यांनी काबीज केली. इंडोनेशिया त्यांनी ताब्यात घेतले होते ते त्यानी हॉलंड स्वतंत्र झाल्यानंतर त्याना परत दिले. फरान्स आणि ब्रिटनला १८ व्या शतकात अमेरिकेतील वसाहती गमवाव्या लागल्या. त्याची भरपाई त्यांनी आशिया आणि आफिरका खंडात नव्या वसाहती काबीज करून केली. आशिया खंडात इंग्रजांनी हिंदुस्तान जिंकले आणि पूर्वेकडे सिंगापूरपासून पश्चिमेकडे एडनपर्यंत आपला जम बसविला. फरान्सने इंडोचायना पादाक्रांत केला.

अनुक्रमणिका







डच, ब्रिटिश आणि परेंच यांनी अंकित प्रदेशात पोर्तुगीज आणि स्पॅनिश लोकाहून निराळी नीती अनुसरली. त्यांच्या चुकापासून धडा घेऊन आशियातील प्रजाजनांवर आपला धर्म सक्तीने लादण्याचे त्यांनी टाळले. व्यापार आणि त्यातून मिळणारे फायदे यावर त्यांनी आपले लक्ष केंद्रित केले. धर्मप्रसाराच्या कार्यावर भर देऊन तद्देशीय प्रजाजनांचा रोष ओढून घेण्याला ते तयार नव्हते. आपल्या व्यापारी नफ्यावर प्रतिकूल परिणाम होऊ नये म्हणून ते सावध होते. हॉलंड आणि डच या दोन्ही देशात लोकमताच्या दडपणाखाली प्रोटेस्टंट मिशनऱ्यांना जरी त्यांनी वसाहतीत कार्य करण्याला मुभा दिली, तरी त्यामुळे राजकीय असंतोष वाढणार नाही याची ते काळजी घेत होते. प्रारंभी मिशनऱ्यावर त्यांचा वचक होता. पण शिक्षणाच्याद्वारे वसाहतीच्या प्रदेशात कारभाराला उपयोगी पडणारे कर्मचारी मिशनऱ्यांच्या कार्यातून तयार होतात हे पाहिल्यानंतर त्यांनी मिशनऱ्यांना अधिक वाव द्यायला सुरुवात केली.

परेंचानी इंडोचायनात थोडयाशा निराळ्या नीतीचा अवलंब केला. पोर्तुगीजांचे अनुकरण करून व्हिएटनाममध्ये त्यांनी रोमन कॅथोलिक मिशनऱ्यांना कार्य करण्याला वाव दिला. त्यात त्यांचा हेतू बाटलेल्या व्हिएटनामी प्रजेतून "पंचमस्तंभ" निर्माण करण्याचा होता. अलिकडच्या काळात अमेरिकनानी परेंचाच्या पंचमस्तंभ निर्माण करण्याच्या या नीतीचे अनुकरण केलेले दिसून येते. पण परेंचानी आपली ही नीती फार सावधपणे वापरली. जपानमध्ये पोर्तुगीजानी मार खाल्ला तशी पाळी त्यांच्यावर आली नाही. पण एकंदरीत परेंच साम्राज्यवादी धर्मप्रसाराच्या बाबतीत फाजील उत्साही कधीच नव्हते.

डचांची मजल तर यापुढेही गेली होती. व्यापाराकरिता आपल्या धर्माची अवहेलना करण्याचीही त्यांची तयारी होती. जपानात वर्षातून एकदा एडो येथे शोगूनच्या दरबारात ख्रिस्ती क्रॉस जाहीररीत्या पायाखाली तुडविण्याचा प्रकार ते करीत होते. यात जपानी लोकांना खूष ठेवण्याचा त्यांचा हेतू होता. हिंदुस्तानामध्ये धर्मात ढवळाढवळ करण्यापासून ब्रिटिश एकंदरीत अलिप्तच होते. तरीही त्यांनी सती, भ्रूणहत्या, धर्माच्या नावाखाली आत्मबलिदान अशा रूढींना कायद्याने बंदी केली.

धर्माच्या बाबतीत उदासीनता हे जसे साम्राज्यविस्ताराच्या दुसऱ्या लाटेचे एक लक्षण होते, तसे दुसरे लक्षण म्हणजे डच, परेंच आणि ब्रिटिश

हे किनाऱ्यावरील बंदरे व्यापूनच राहिले नाहीत, तर त्यांनी अंतर्गत भागात दूरपर्यन्त आपले हातपाय पसरले. डचांनी आरंभी इंडोनेशियाच्या किनाऱ्यावरची काही बंदरे व्यापली होती. पण हळूहळू त्यांचा विस्तार वाढून सबंध द्वीपसमूह त्यांनी पादाक्रांत केला. फ्रेंचाना दक्षिण भारतात जरी माघार घ्यावी लागली, तरी त्यांनी आपला विस्तार इंडोचायनामध्ये केला.

ब्रिटिशांनी हिंदुस्तान जिंकला तो तांत्रिक विद्येतील श्रेष्ठत्वामुळे नव्हे. जरी त्यावेळी इंग्लंडमध्ये औद्योगिक क्रांती सुरू झाली होती, तरी सारा हिंदुस्तान त्यांच्या ताब्यात आला त्यावेळी वाफेवर चालणाऱ्या आगबोटी निर्माण झाल्या नव्हत्या, सुएझ कालवा खोदून झाला नव्हता किंवा भारतामध्ये रेल्वेचे जाळेही बांधून झाले नव्हते. ब्रिटिशांचे सैन्य भारतीय सैन्याच्या तुलनेने फार मोठे अधिक शस्त्रसज्ज होते असेही नव्हे. ब्रिटिशांचा विजय होण्याला कारणीभूत झालेल्या गोष्टी म्हणजे सरकारी कारभारातील स्थैर्य, त्यांच्या एकंदर पद्धतीतील कार्यक्षमता आणि त्यांची कडक लष्करी शिस्त ह्या होत. १४ व्या ते १६ व्या शतकापर्यन्त ऑटोमन तुर्कांचे साम्राज्य या तिन्ही बाबतीत युरोपीयांपेक्षा वरचढ होते. म्हणून त्यांना युरोपीयांचा पराभव करता आला; पण १७ व्या शतकामध्ये या तिन्ही बाबतीत युरोपीय वरचढ झाले आणि ब्रिटिशांनी हिंदुस्तान जिंकल्यामुळे सत्तेच्या समतोलनामध्ये ब्रिटिशांचे पारडे जड झाले. १८ व्या शतकात मोगलांच्या साम्राज्याला ओहोटी लागल्यानंतर त्यांची जागा मराठ्यांनी घेतली. मराठ्यांचे चपळ घोडदळ मोगलांना भारी झाले. पण ब्रिटिशांच्या शिस्तबद्ध लष्करापुढे त्यांचेही काही चालेना आणि एका शतकाच्या अवधीत सारा हिंदुस्तान त्यांना जिंकता आला.

## प्रखर प्रतिकाराची उदाहरणे

साम्राज्यविस्ताराच्या या दुसऱ्या लाटेमध्ये मधून मधून आशियाई लोकांच्या प्रखर प्रतिकाराला साम्राज्यवाद्यांना तोंड द्यावे लागत होते हेही खरे आहे. पुढे घडणाऱ्या गोष्टींची जणू ही पूर्वचिन्हे होती. १८३९ मध्ये अफगाणिस्तानवर स्वारी करण्याचा ब्रिटिशांनी प्रयत्न केला. पण १८४१ मध्ये पठाणांनी इंग्रज फौज निपटून काढली. शिखाबरोबरची दोन युद्धे सुद्धा इंग्रजांना फार महागात पडली. १८५७ साली ब्रिटिशांच्या कवायतीत तयार झालेल्या सैनिकांनीच बंड केले होते. बंडवाल्यांनी मोठे धाडस आणि चतुराई दाखविली हे मान्य करावे लागते. डचांनी १६२४ मध्ये तैवान बेटात आपले बस्तान बसविले होते. पण ३७ वर्षांनी चीनमधून जे निर्वासित आले

अनुक्रमणिका

त्यांनी डचांना त्या बेटातून हाकलून लावले. ब्रिटिशांनी जसे हिंदुस्थान जिंकले तसेच डचांनी इंडोनेशियाचे द्वीपसमूह जिंकून घेतले. पण सुमात्रा बेटाच्या नैऋत्येच्या टोकाला असणारे आचीन हे छोटे बेट जिंकण्याला डचांना ३४ वर्षे लागली. इतका प्रखर प्रतिकार तेथील जनतेने केला. उत्तर व्हिएटनाममध्ये फरेंचाना यापेक्षाही वाईट अनुभव घ्यावा लागला. दक्षिण व्हिएटनाम त्यांनी जिंकला होता. उत्तर व्हिएटनाम जिंकण्याकरिता १८७३ पासून १८८५ पर्यंत फरेंचानी जंग जंग पछाडले. पण तेथील गनिमी तुकडयांनी त्यांना हैराण केले आणि एकामागून एक पराभव खाण्याची त्याना पाळी आली. इतकेच नव्हे तर त्यातून चीनबरोबर युद्ध करण्याचा प्रसंग त्यांच्यावर ओढवला, त्यावेळचा हा अनुभव फरेंच विसरले म्हणूनच त्यांना दुसऱ्या महायुद्धानंतर दीएन बीएन फू येथे न भूतो न भविष्यति असा पराभव पत्करावा लागला. उत्तर व्हिएटनामच्या बाबतीत अमेरिकाही या अनुभवावरून शहाणी झाल्याचे दिसून येत नाही.

## सूर्य न मावळणारे साम्राज्य

१७४५ मध्ये आशिया खंडात ब्रिटिशांजवळ भारतीय किनाऱ्यावर काही मोजकी व्यापारी ठाणी होती. १६२३ मध्ये डचांनी त्याना इंडोनेशियातून हाकलून लावले होते. तसेच ब्रिटिशांनी दक्षिण भारतातून फरेंचाना हाकलून लावल्यानंतर फरेंचापाशी ठराविक बंदरेच तेवढी राहिली. त्यानंतर ब्रिटिश साम्राज्य उत्तरोत्तर इतके पसरत गेले की १९४१ मध्ये जपान्यानी हल्ला करीपर्यंत जिब्राल्टरपासून चीनमधील ताएन्स्तिन बंदरापर्यंत ते पसरले होते. पेकिंगच्या टप्प्यात असणाऱ्या ताएन्स्तिन या बंदरात चीनी सम्राटाकडून ब्रिटिशांनी सवलती मिळविल्या होत्या. जिब्राल्टर, माल्टा आणि सुएझ कालवा यांची गणना ब्रिटनच्या आशियाई साम्राज्यातच करावी लागेल. स्पेनबरोबरच्या युद्धात ज्यावेळी ब्रिटिशांनी जिब्राल्टर जिंकून घेतले, त्यावेळी आशियात एवढे मोठे साम्राज्य मिळू शकेल हे त्यांच्या स्वप्नीही नव्हते. पण पुढे १८५० मध्ये आलेक्झांड्रिया-कैरो-सुएझ रेल्वे तयार झाल्यानंतर आणि १८६९ मध्ये सुएझ कालवा बांधल्यानंतर आशियाच्या मार्गावरील ते महत्वाचे ठाणे बनले. १८७५ मध्ये ब्रिटिशानी सुएझ कालव्याचे शेअर्स मोठ्या प्रमाणात खरेदी केल्यामुळे त्या कालव्याच्या नियंत्रणात त्याना हक्क प्राप्त झाला. माल्टाची तशीच गोष्ट आहे. नेपोलियनने १७९८ मध्ये माल्टा बेट ज्यावेळी जिंकून घेतले त्यावेळी कदाचित इजिप्त आणि भारत यावर डोळा ठेवूनच ते त्याने घेतले असावे. पण नंतर ब्रिटिशानी फरेंचांपासून ते जिंकून घेतले.

१९४१ ची परिस्थिती पाहिली तर ब्रिटिश साम्राज्यात पूर्वेकडील सर्व महत्वाची बंदरे होती. जिब्राल्टर, माल्टा, पोर्ट सैद, सुएझ, एडन, कराची, मुंबई, कोलंबो, मद्रास, कलकत्ता, पेनांग, सिंगापूर, हाँगकाँग, ही सारी ब्रिटिशांच्या ताब्यात होती. शांघाय बंदरावर चिन्यांचा ताबा नाममात्र होता. तेथील नगरपालिकेचा कारभार इंटरनॅशनल सेटलमेंट आणि फरेंच सेटलमेंट चालवीत असत. इंटरनॅशनल सेटलमेंटमध्ये ब्रिटिशांचे वर्चस्व होते; पण जपानच्या बाबतीत मात्र त्यांची डाळ शिजली नाही. त्याने आपले अस्तित्व स्वतंत्र राखले. इतकेच नव्हे तर १९४१ मध्ये आपले सामर्थ्यही पाश्चात्यांना चांगलेच दाखविले. ब्रिटिश साम्राज्यावर अचानक झडप घालून जपानने चीनमध्ये ब्रिटिशाना मिळणाऱ्या साऱ्या सवलती खलास केल्या. शांघाय, हाँगकाँग. सिंगापूर ही बंदरे काबीज केली आणि मलाया आणि ब्रह्मदेश ही पादाक्रांत केली. यावेळी ब्रिटिश आपल्या साम्राज्याचे रक्षण करण्याला असमर्थ ठरले. आग्नेय आशियातील ब्रिटिशांचे वर्चस्व संपुष्टात आले.

ब्रिटिश साम्राज्य ज्यावेळी कळसास पोचले होते, त्यावेळी त्यांचे वर्चस्व नकाशात दाखविण्यात येणाऱ्या तांबड्या प्रदेशापेक्षाही दूरवर विस्तारले होते. आरमारी सामर्थ्याच्या जोरावर त्यांचा राजकीय प्रभाव साम्राज्याबाहेरही पडत होता. त्यांचे व्यापारी साम्राज्य तर आशियातील प्रत्येक देशात प्रस्थापित झाले होते. त्या देशाना आयात जकात इतकी कमी करायला ते भाग पाडीत असत की देशी मालाला ब्रिटिश मालाबरोबर स्पर्धा करणे अशक्य व्हावे. इंग्लंडमध्ये औद्योगिक क्रांती सुरू झाल्यानंतर तेथील विणकरांची दैना झाल्याचे आम्ही वाचतो. पण ब्रिटिश यंत्रमागाच्या कापडाच्या आयातीने आशियातील लक्षावधी विणकरांचे जीवन उध्वस्त झाले होते; या गोष्टीकडे कोणाचे फारसे लक्ष जात नाही.

इंग्लंडची औद्योगिक क्रांती आणि ब्रिटिश साम्राज्याची वाढ ही जणू हातात हात घालून चालली होती. १७४५ ते १७६१ च्या दरम्यान दक्षिण भारतातील स्पर्धेत इंग्लंडने फरेंचाना मागे हटविले होते. १७५७ च्या प्लासीच्या लढाईतील विजयामुळे बिहार, बंगाल आणि ओरिसा या प्रांतात इंग्रजांना हात पसरता आले. याचवेळी औद्योगिक क्रांतीचे सूतोवाच होत होते. गव्हर्नर जनरल वेलस्ली (१७९८–१८०५) याने सबंध भारत आपल्या राजकीय वर्चस्वाखाली आणण्याचे धोरण अवलंबिले त्यावेळी ब्रिटनमधील औद्योगिक क्रांती खूपच प्रगत झाली होती. १८४९ मध्ये पंजाब खालसा केला त्यावेळी

तर ती कळसास पोचत होती. यावेळी ब्रिटिशांनी सारा भारत जिंकला होता इतकेच नव्हे तर १८४०-४२ च्या चीनबरोबरच्या युद्धामुळे चीनची दारे त्याला सताड उघडी झाली होती.

ब्रिटिशांच्या व्यापारपेठा वाढत होत्या; त्याबरोबर त्यांची साम्राज्य-विस्ताराची हावही वाढत होती. साम्राज्यविस्ताराच्या या काळात ब्रिटिशांनी आशियाई प्रजाजनाशी संबंध कसे ठेवले होते आणि आपली नैतिक पातळी कशी राखली होती हे पहाणे उद्‌बोधक ठरेल. विशेषतः १७६१ नंतर भारतात ब्रिटिशांना कोणीही पाश्चात्य प्रतिस्पर्धी उरला नव्हता तो काळ त्यांच्या नैतिक कसोटीचा होता. त्यांना भारतात जशी अनियंत्रित सत्ता मिळाली होती तशी तुर्कस्तान किंवा चीनमध्ये मिळाली नव्हती. या अनियंत्रित सत्तेचा त्यांनी दुरुपयोग का सदुपयोग केला हे भारतातील त्यांच्या नीतीवरून ठरविले पाहिजे. तुर्कस्तान आणि चीनची गोष्ट निराळी होती. तुर्कस्तानच्या राजकारणात युरोपीय सत्तांचा हस्तक्षेप होत होता आणि चीनमध्ये ब्रिटनशिवाय रशिया, फरान्स आणि अमेरिका यांचे हित-संबंध होते. आशियातील राज्यसत्ता चीन आणि तुर्कस्तान यांच्या आधीच मोडकळीला आल्या होत्या. १७०७ मध्ये औरंगजेबाचा मृत्यु झाल्यानंतर भारतामध्ये अराजक माजले. तशी स्थिती चीनमध्ये १९११ नंतर प्राप्त झाली होती. पण १९२९ पर्यंत चीनमध्ये पुनः राजकीय ऐक्य निर्माण झाले; ते कम्युनिझमच्या आक्रमणापर्यन्त टिकून होते. त्यामुळे भारतात जितके पाश्चात्याना रान मोकळे होते तितके चीनमध्ये ते मिळाले नाही.

मोगलांचे राज्य जोपर्यन्त प्रभावी होते तोपर्यन्त ब्रिटिश, डच, फरेंच आणि डॅनिश लोकांना मुंबई, गोवा, पाँडेचेरी, मद्रास यासारख्या बंदरांच्या भागात राहून व्यापारापुरतेच आपले कार्यक्षेत्र मर्यादित ठेवावे लागत होते. मोगलांच्या परवानगीशिवाय त्यांना तटबंदी करता येत नसे किंवा स्वरक्षणार्थ सैन्यही उभे करता येत नसे. मोगलांची सत्ता जशी क्षीण होत गेली तसे हळुहळू त्यांनी स्वरक्षणार्थ सैन्य उभे करायला सुरुवात केली. पुढे पुढे त्यांचे सैन्य वाढत चालले. दक्षिणेत फरेंच आणि ब्रिटिश यांच्या सत्तास्पर्धेत या दोघानीही मोठा फौजफाटा बाळगला होता. क्लाइव्हच्या प्लासीच्या विजयाने ब्रिटिशाना समजून आले की फरेंचांचा बंदोबस्त केला की भारतातील कोणतीही सत्ता लष्करी सामर्थ्यात त्यांच्याबरोबर टिकाव धरू शकणार नाही. वर सांगितलेले पाश्चात्याना पत्करावे लागलेले पराभव हे

अपवादात्मकच होते. पाश्चात्य काही अगदी अजिंक्य नव्हते हे दाखविण्या-पुरताच त्यांचा उपयोग आहे. थोडयाशा लष्करी सामर्थ्यावर पाश्चात्य साम्राज्ये प्रचंड लोकसंख्येचे प्रदेश काबूत ठेवू शकतात हा आभास त्यानी निर्माण केला होता.

हा भ्रम प्रथम जपान्यांनी १९४१ साली पर्ल हार्बरमधील अमेरिकेचे आरमार उध्वस्त करून फोडला. अमेरिका, डच, फरेंच आणि ब्रिटिश यांचे अंकित प्रदेश एकामागून एक जपानने काबीज केले. पण जपानचा हा दिग्विजय जितका खळबळजनक तितकाच अल्पजीवी ठरला. जपान्यांना वाटत होते की आपली भूमी ही "देवभूमी" आणि ही भूमी जगज्जेती होणार आहे. त्या धुंदीत त्यानी आग्नेय आशियात धुमाकूळ घातला. पण त्याची अखेर भयानक पराभवात झाली. प्रथम समुद्रात त्यानी पॅसिफिकमधील अमेरिकन आरमाराकडून मार खाल्ला आणि नंतर अणुबाँबच्या स्फोटाने त्याना संपूर्ण शरणागति पत्करावी लागली.

पण जपानच्या तात्पुरत्या विजयाने आशिया आणि पश्चिमेतर राष्ट्रे यांच्या बाबतीत इतिहास घडविला यात शंका नाही; त्याचा मानसिक परिणाम मोठा झाला. पश्चिम राष्ट्रे अजिंक्य आहेत हा भ्रम कायमचा नाहीसा झाला. १७८३ ते ८५ मध्ये उत्तर व्हिएटनामी जनतेने फरेंचांचा मोठ्या शौर्याने प्रतिकार केला होता. पण तो निष्फळ ठरला होता. पण जपानच्या पराक्रमाने व्हिएटनाम्यांचा उत्साह वाढला. त्यांनी फरेंचांचा तर सपाटून पराभव केलाच; पण अमेरिकेच्या प्रचंड लष्करी सामर्थ्याला ते आज निकराने तोंड देत आहेत.

## ब्रिटिशांची साम्राज्यनीति

१७५७ पासून १९४७ पर्यंत ब्रिटिशानी भारतात अनियंत्रित सत्ता उपभोगली. त्यांच्या साम्राज्यसत्तेला हे एक आव्हानच होते. आणि त्या आव्हानाला त्यानी कसा प्रतिसाद दिला हे पहाणे उद्बोधक आहे. त्यांचा हा प्रतिसाद तीन अवस्थांतून गेला आहे.

पहिली अवस्था १७५७ च्या प्लासीच्या विजयापासून १७८६ साली कॉर्नवालीसची गव्हर्नर जनरल म्हणून नेमणूक होईपर्यंत टिकली. ईस्ट इंडिया कंपनी या खाजगी व्यापारी कंपनीचे मूठभर गोरे नोकर भारतात असत. या नोकरांचे पगार अगदी तुटपुंजे होते. पण त्याना खाजगी व्यापार करून पैसा मिळवून श्रीमंत होण्याची मुभा कंपनीने ठेवली होती. हे मूठभर नोकर भारतातील असंख्य प्रजाजनांचे धनी झाले होते. बिहार आणि बंगालच्या

अनुक्रमणिका

गरीब रयतेला लुटायचा मार्ग त्याना मोकळा होता. हे परकी गोरे प्राचीन साम्राज्यातील करवसूली करणाऱ्या अधिकाऱ्यासारखे जुलमी होते, ( हे अधिकारी स्वतंत्र राज्ये साम्राज्यात सामील झाल्यानंतर तेथील प्रजाजनांचा अतोनात छळ करीत असत. ) इतकेच नव्हे तर ईस्ट इंडिया कंपनीचे हे अधिकारी त्यांच्या पूर्वीच्या मुस्लीम सत्ताधाऱ्यापेक्षाही जुलमी झाले होते. हे ब्रिटिश व्यापारी-जुलूमशहा, अन्यायी, छळवादी, लुटारू आणि भ्रष्ट होते. पण तद्देशीयाशी सलगी करीत आणि खेळीमेळीने रहात. हिंदी स्त्रियाशी लग्ने करून संसार करीत. काहीजण रखेल्याही ठेवीत. कंपनीचे ब्रिटिश अधिकारी नबाबासारखे रहात आणि वागत असत. झोफानी हा इंग्रज चित्रकार याच काळात भारतात येऊन गेला. त्याने रंगविलेल्या चित्रावरून त्याकाळच्या परिस्थितीची, या अधिकाऱ्यांच्या विलासी व भ्रष्ट जीवनाची कल्पना येते. या सर्वांची परिणती वारेन हेस्टिंग्ज याच्या चौकशीत झाली आणि ८ वर्षांच्या चौकशीनंतर जरी तो दोषमुक्त झाला, तरी त्या चौकशीने भारतातील इंग्रजांच्या वागणुकीवर विदारक प्रकाश टाकला.

कॉर्नवालीसची गव्हर्नर जनरल पदाची पहिली कारकीर्द १७८६ ते १७९३ पर्यंत झाली. या काळात कारभारात पद्धतशीरपणे सुधारणा घडवून आणण्याच्या कार्याला तो लागला. त्याचे हे कार्य नंतर वेलस्लीने ( १७९८-१८०५ ) पुढे चालविले. त्यांचे हे प्रयत्न यशस्वी झाले. या त्यांच्या कार्याची तुलना रोमन सम्राट ऑगस्टस याने आपल्या नोकरशाहीत घडवून आणलेल्या सुधारणाशी करता येईल. त्यांच्या या प्रयत्नामुळे ब्रिटिशांच्या भ्रष्ट कारभारात सुधारणा झाली. पण त्याचा एक परिणाम असा झाला की, ब्रिटिश राज्यकर्ते हिंदी प्रजाजनापासून अलिप्त राहू लागले. त्यांच्यात दुरावा निर्माण झाला. त्यांची एक नवी जातच निर्माण झाली.

कॉर्नवालीस आणि वेलस्ली यांचा हा एक प्रकारे विक्रमच होता. तो टिकून रहायला आणखी एका गोष्टीची भर पडली. याच वेळी वाफेवर चालणाऱ्या बोटींचा शोध लागला. त्यामुळे इंग्लंडशी दळणवळण सुलभ आणि जलद होणे शक्य झाले. पूर्वी भारतात येणे म्हणजे वर्षानुवर्षे मायदेशाशी ताटातूट होत असे. आता ही परिस्थिती बदलली. इंग्रज अधिकाऱ्यांना गोऱ्या स्त्रियाशी लग्ने करून त्याना भारतात आणणे आणि आपल्या मुलाबाळाना शिक्षणाकरिता इंग्लंडमध्ये पाठविणे शक्य झाले. ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या गोऱ्या पत्न्यानी आपल्या नवऱ्यांच्या हिंदी स्त्रियांशी होणाऱ्या शरीरसंबंधाला पायबंद घातला. इतकेच नव्हे तर हिंदी प्रजेशी सामाजिक दळणवळणही बंद केले.

या सर्वांमुळे भारतातील ब्रिटिश शासक आणि एतद्देशीय जनता यांच्यामध्ये परकेपणा निर्माण झाला. त्यातून या दोघामध्ये कटुतेची भावना निर्माण झाली आणि तिचे फळ १८५७ च्या बंडात प्रत्ययास आले. या बंडात दोन्ही पक्षांनी भयानक अत्याचार केले. बंडवाल्यानी ब्रिटिश बायकामुलांची कत्तल केली आणि ब्रिटिशानीही दिसेल त्या बंडखोरांना सरसहा गोळ्या घालून ठार केले. १७८९ मध्ये पॅरिसमध्ये गिलोटिन करण्याचे प्रकार झाले त्याचीच भारतीय पुनरावृत्ति दिल्लीत झाली. पण भारतीय अत्याचार हे अधिक पाशवी होते. एक म्हणजे ते निघृणपणे करण्यात आले आणि दुसरे म्हणजे ते परकीय जेत्यानी केले होते आणि जेत्यांनी आगंतुक येऊन तलवारीच्या जोरावर भारत जिंकला होता. याचा परिणाम असा झाला की, ब्रिटिशांचे भारतीयांशी संबंध हे मानवामानवातील समानतेचे संबंध राहिले नाहीत. इ. एम्. फॉर्स्टर याने आपल्या "A Passage to India" या कादंबरीत हे संबंध अत्युत्कृष्ट चितारले आहेत. पण शेवटी ब्रिटिशानी १९४७ मध्ये भारतातून आपण होऊन माघार घेतली, त्याचे परिणाम उपकारक ठरले. वातावरण एकदम बदलले आणि दोघात समानतेचे आणि स्नेहाचे संबंध निर्माण झाले.

वर वर्णन केलेल्या पहिल्या दोन अवस्थांत त्यांचे विशिष्ट असे दोष होते हे खरे असले आणि ब्रिटिशानी शस्त्रबळावर हिंदुस्थान जिंकून घेतले असले तरी आपले राज्य स्थापन केल्यानंतर त्यानी या मोठ्या भूप्रदेशाला अत्यावश्यक असलेली शांतता प्राप्त करून दिली. प्राचीन रोमन साम्राज्याने ज्याप्रमाणे साऱ्या भूमध्यसागरी जगात शांतता प्रस्थापित केली, त्याप्रमाणे या खंडप्राय देशाला इंग्रजांच्या साम्राज्याने शांतता मिळवून दिली. सम्राट अशोकाच्या काळानंतर खि. पू. ३ ऱ्या शतकात मौर्य साम्राज्याचा अस्त झाल्यावेळेपासून हिंदुस्थानाला प्रथमच १८५७ ते १९४७ या कालखंडात अखंड अशी अंतर्गत शांतता लाभली. रोमन साम्राज्याच्या पतनाने युरोपीय जगाला जशी किंमत द्यावी लागली तशीच भारतालाही द्यावी लागली. देशाच्या फाळणीमुळे लक्षावधी लोकांची कत्तल झाली; लाखो लोकांना स्थलांतर करावे लागले; हिंदुस्थान आणि पाकिस्तान यांच्यात शत्रुत्व चालू राहिले आणि सतत कुरबुरी होत राहिल्या. ही किंमत मोठी तर खरीच. पण ब्रिटिशांनी आपले साम्राज्य सक्तीने चालू ठेवले असते तर यापेक्षाही अधिक भयानक अनर्थ ओढवले असते आणि तितकेच रक्त सांडले असते. शिवाय ते अनैतिक ठरले असते आणि शेवटी अयशस्वीही झाले असते हेही निश्चित.

अनुक्रमणिका

ब्रिटिश राज्याची तिसरी अवस्था १९१७ ते १९४७ पर्यन्त टिकली. ही अवस्था अभूतपूर्व, विलक्षण आणि राज्यकर्ते आणि प्रजाजन या दोघा-नाही श्रेयस्कर ठरली. ईस्ट इंडिया कंपनीने मोगल राज्याचा वारसा म्हणून फारसी भाषा चालू ठेवली होती. पण १८३५ मध्ये ब्रिटिश सरकारने फारसीऐवजी कारभाराची आणि शिक्षणाची भाषा म्हणून इंग्रजी भाषेला आद्य स्थान दिले. या धोरणाचा पुरस्कर्ता लॉर्ड मेकॉले हा होता. भारतात इंग्रजी भाषा प्रस्थापित करताना त्याने भाकित केले की, हिंदी लोक इंग्रजी शिक्षणाच्या योगाने कालांतराने राजकीय स्वातंत्र्याची मागणी करतील आणि ब्रिटिशांना ते त्यांना द्यावे लागल. त्याचे भाकित खरे ठरण्याची चिन्हे लवकरच दिसू लागली. १८९० च्या सुमारास स्वराज्याची मागणी करणाऱ्या काँग्रेस पक्षाच्या चळवळीला मूर्त स्वरूप येऊ लागले. १९१४ चे पहिले महायुद्ध सुरू झाल्यानंतर ब्रिटिशांच्या अडचणींचा फायदा घेण्याऐवजी हिंदी लोकांनी ब्रिटिशांना युद्धात साहाय्य केले. भारतीयांच्या या औदार्याचा आणि दूरदृष्टीचा ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या मनावर चांगला परिणाम होऊन १९१७ मध्ये पार्लमेंटने हिंदी लोकांना हप्त्या हप्त्याने स्वराज्य देण्याचे जाहीर केले. ( या ऐतिहासिक प्रसंगाच्या वेळी टॉयन्बी स्वतः ब्रि० पार्ल-मेंटमध्ये प्रेक्षकांच्या गॅलरीत हजर होते. ) ब्रिटिशांनी दिलेले हे अभिवचन पुढील ३० वर्षांच्या काळात त्यांनी पुरे केले.

या ३० वर्षांच्या काळात ब्रिटिशांनी हळुहळू लष्करी आणि सनदी नोकऱ्यातील वरिष्ट जागांवर हिंदी लोकांची नेमणूक करण्याला सुरुवात केली. शासकीय कारभाराची जबाबदारी उचलण्याचा प्रत्यक्ष अनुभव भारतीयांना यावा या दृष्टीने ब्रिटिशांनी त्यांना तयार करण्याचा प्रयत्न केला. सत्तांतर होण्याचा हा ३० वर्षांचा काळ उभयपक्षी फारसा सुखाचा गेला असे नाही. पण आता मागे वळून पहाता ब्रिटिश राज्यकर्ते बऱ्याच शहाणपणाने वागले असे म्हणावे लागते. या बाबतीत त्यांची बेल्जियमशी तुलना करून पहाण्यासारखी आहे. कांगोमध्ये बेल्जियम राज्य कर्त्यांनी कांगोली लोकांना राज्यकारभारापासून वंचितच ठेवले होते आणि शेवटी एकाएकी कांगो सोडून ते निघून गेले आणि मग कांगोमध्ये एकच गोंधळ माजला. प्रथम भारतीय जनता ब्रिटिशांच्या हेतूविषयी साशंक होती. पण पुढे भारतात जे सत्तांतर झाले ते रक्तपाताशिवाय झाले हे लक्षात ठेविले पाहिजे आणि हे सत्तांतर मागे कोणतीही कटुता न रहाता झाले. याचे श्रेय मोठ्या प्रमाणात महात्मा गांधींकडे जाते. कारण गांधींच्या अहिंसात्मक असहकाराच्या धोरणाने ब्रिटिशांना फार काळ

राज्य करणे अशक्य करून टाकले आणि भारत सोडताना सुद्धा आपली पदच्युति त्यांनी शांततेच्याच मार्गाने करून घेतली. हिंसात्मक मार्गाशिवाय राजकीय परिवर्तन होते हे दाखवून दिल्यामुळे महात्मा गांधी हे आजच्या अणुयुगात साऱ्या मानवजातीचे द्रष्टे ठरले आहेत. कारण या नव्या युगात हिंसा म्हणजे आत्मघातच होय.

१९४७ मध्ये ग्रेट ब्रिटनने भारत, पाकिस्तान, ब्रह्मदेश आणि सिलोन या देशात जो सत्तात्याग केला त्याने ब्रिटिश, फ्रेंच आणि डच यांच्या साम्राज्य-विस्ताराच्या दुसऱ्या लाटेचा अस्त झाला. १९४७ मध्ये ब्रिटनने सुरू केलेल्या स्वातंत्र्यदानाच्या प्रक्रियेची परिणती फ्रान्सने अल्जिरियाला केलेल्या स्वातंत्र्य-दानात झाली. अल्जिरियाचा प्रश्न अधिक बिकट आणि धोक्याचा झाला होता. जर्मनाकडून आणि व्हिएटनाम्यांकडून पराभूत झाल्याने फ्रेंच सैन्य अवमानित झाले होते. त्या अवमानाचे उट्टे ते अल्जिरियात काढू पहात होते आणि अल्जिरियातील फ्रेंच वसाहतकार हिंसात्मक प्रतिकारही मोठ्या प्रमाणात करीत होते. अल्जिरियाला स्वातंत्र्य देण्याला द गॉलचे धैर्य आणि मुत्सद्देगिरी हीच हवी होती.

## तिसरी लाट

१९४७ मध्ये अशाप्रकारे आशियात साम्राज्यांचा अस्त झालेला पाहून पश्चिमी साम्राज्यशाही आशियातून कायमचीच नाहीशी झाली आणि दुसरी लाट ही शेवटचीच लाट ठरेल असे वाटत होते. युनायटेड स्टेटस्ने याचवेळी फिलिपाईन मधील आपली साम्राज्यसत्ता सोडून दिली होती. त्यावेळी अमेरिकेच्या रूपाने पश्चिमी साम्राज्यशाहीची तिसरी लाट आशियावर धडकेल अशी कल्पनाही आली नव्हती. पण १९४६ नंतर जिब्राल्टरपासून ते टिन्स्टिनपर्यंत पसरलेल्या ब्रिटिश सांखळीची जागा अमेरिकेने तयार केलेल्या साखळीने घेतली. नाटो गटाच्या योगाने ग्रीस, तुर्कस्तान, आणि सौदी अरेबियापासून थायलंड, तैवान, ओकीनावा ते दक्षिण कोरिया अशी साखळी अमेरिकेने तयार केली.

टॅसिटस या इतिहासकाराने ज्यूबद्दल असे म्हटले आहे की, त्यांनी पर्शियन साम्राज्यामागून आलेल्या सेल्युसिड मॅसिडोनियाच्या ग्रीक सत्तेचा यशस्वीरीत्या प्रतिकार केला; तसाच प्रतिकार रोमन सत्तेचा करता येईल हा त्यांचा अंदाज सर्वस्वी चुकला आणि अनन्वित संकटपरंपरा त्यांच्यावर कोसळली. आधुनिक आशिया याचप्रमाणे अमेरिकेच्या तिसऱ्या लाटेला बळी





पडणार आहे काय ? किंवा दुसऱ्या महायुद्धापूर्वी इटलीने इथिओपिआवर आक्रमण करून जी चूक केली तशीच अमेरिका आग्नेय आशियात करीत नाही ना ?

पश्चिमी सत्ता अजिंक्य आहेत हा भ्रम दुसऱ्या महायुद्धात जपानने ज्या क्षणी खोटा ठरविला त्यावेळेपासून आशियातील पश्चिमी साम्राज्ये ही कालविसंगत ठरली नाहीत काय ? व्हिएटनामचे युद्ध अगतिकतेने पहाण्याचा प्रसंग बहुसंख्य मानवजातीवर आला आहे असेच म्हटले पाहिजे. अमेरिकन लोकांना स्वतःला आणि स्वतःबरोबर सगळ्या मानवजातीला वाचविण्याची सुबुद्धी वेळीच सुचेल अशी आशा करीत रहाणे एवढेच आपल्या हाती आहे. हा विचार अगदीच तर्काला सोडून नाही. कारण या अणुयुगात केवळ साम्राज्यशाहीच नव्हे तर युद्धे आणि विशेषतः राष्ट्रविस्ताराची जुन्या तऱ्हेची युध्दे कालबाह्य ठरली आहेत.





अनुक्रमणिका








श्री. रा. वि. ओतुरकर, पुणे

# इतिहाससंशोधनाने-
# प्रबोधन होत आहे काय?

वरील प्रश्न माझे दिवंगत मित्र दि. के. बेडेकर यांनी मला एका लेखासाठी शीर्षक म्हणून मजकडे दिला होता. तेव्हा मला त्याचे उत्तर नीटसे देता आले नाही. प्रस्तुत लेखात त्या दिशेने शोध घेण्याचा यत्न करीत आहे. गतिमान जीवनात प्रस्थापित जीवनमूल्ये कालबाह्य ठरतात व नव्या जीवन-मूल्यांचा शोध घ्यावा लागतो. अशी जीवनमूल्ये तयार स्वरूपात कोठेही आयती सापडत नाहीत, तर जीवनाच्या झगड्यात व विचारवंताच्या चिंतनात हलके हलके त्याचे अस्पष्ट दर्शन होत जाते. महाराष्ट्रापुरते पहावयाचे तर स्वराज्य माझा जन्मसिद्ध हक्क आहे या मंत्राने राजकीय क्षेत्रात असे जीवन-मूल्य टिळकांनी दर्शविले. तसेच आगरकरांनी आपल्या सुधारकातील लेखांतून जीर्ण सामाजिक चालीरीती व रूढींवर प्रखर प्रहार केले व त्याच्या आधी कित्येक वर्षे जोतीराव फुल्यांनी आपल्या वर्तनाने व सत्यशोधक समाजाच्या स्थापनेने सर्व हिंदु समाजच तळापासून ढवळून काढण्याच्या उद्योगास हात घातला. काव्याच्या क्षेत्रात केशवसुतांबद्दल हेच म्हणता येईल. महाराष्ट्रात इतिहाससंशोधन इ. स. १८४४ पासून म्हणजे बाळशास्त्री जांभेकरांच्या काळापासून आज १३० वर्षे चालू आहे. त्यामुळे कितपत प्रबोधन होत आहे किंवा नाही असा प्रश्न या विषयाच्या अभ्यासकांनी आत्मनिरीक्षणार्थ स्वतःस विचारावयास हवा. याच्यापूर्वी नव्या मूल्यांच्या शोधार्थ आपणांस जावयास लागत नाही. वास्तविक इतिहासाकडे व्यापक व सामाजिक दृष्टीने पहाण्याचे काम इसवी सनाच्या दहाव्या शतकात होऊन गेलेल्या आल्बिरुनीने केले होते. तो गझनीच्या महमुदाबरोबर हिंदुस्थानात आला होता व त्याने तत्कालीन हिंदु समाजावर डोळे उघडण्याजोगे लेखनही केले आहे, पण त्याच्या लेखनाकडे आपले लक्ष गेले नाही. चौदाव्या शतकात

अनुक्रमणिका






इस्लामी जगतात इब्न खाल्दून होऊन गेला. त्याच्या इतिहासविषयक लेखनाला एक शास्त्रीय बैठक आहे. पण आपण तिचा मागोवा घेऊ शकलो नाही. आपण जुन्या पुराणांच्या वळणावर मराठीत बखरी लिहिणे सुरू केले. त्यांतीलही काही, उदा. पंधराव्या शतकांतील महिकावतीची बखर व सतराव्या शतकाअखेरची सभासदी बखर उपयुक्तही आहेत. पण बाकी बहुतेक 'स्वामि माहात्म्य' सांगणाऱ्या आहेत. हा प्रकार एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धातही चालू होता. पण बाळशास्त्री जांभेकर, रामकृष्ण विश्वनाथ, भाऊदाजी लाड हे जेव्हा शिलालेख, गिरिलेख, किंवा प्राचीन माहिती तपासून आपली अशी नवी अनुमाने काढू लागले व कित्येक प्रस्थापित समजुती चुकीच्या आहेत असे धिटाईने सांगू लागले तेव्हा जाणते वाचक तिकडे आश्चर्याने पाहू लागले. त्यानंतर इ. स. १८६७ साली नी. ज. कीर्तने यांनी ग्रँटडफच्या कित्येक विधानांवर आक्षेप घेतला. डफचे पुस्तक नजीकच्या मराठ्यांच्या इतिहासावर असल्यामुळे व कीर्तने यांची टीका महाराष्ट्रीयांचा अभिमान फुलविणारी असल्यामुळे इतिहाससंशोधनाकडे काही जाणत्यांचे लक्ष वेधले. येथे हे मुद्दाम सांगितले पाहिजे की जे डफच्या इतिहासासंबंधी आपला ग्रह करून घेतात. त्यातील अनेकांनी मूळचा डफ वाचलेलाही नसतो. डफच्या कित्येक विधानांवर कीर्तने यानी केलेली टीका रास्त असली तरी डफने मराठ्यांची समाजरचना, ग्रामव्यवस्था व राज्यकारभार यासंबंधी जी माहिती दिली आहे. ती नुसती चिटणिशी बखरीवर आधारभूत नाही. डफवर प्रखर टीका करणारे राजवाडेही त्यांच्या राजकीय घटनांतील चुका दाखवितात पण त्याने सांगितलेल्या मराठी समाजव्यवस्थेबद्दल क्वचितच तशी टीका करताना वाचकांस आढळतील. ते असो. कीर्तने यांच्या टीकेने महाराष्ट्रात संशोधनाचे नवयुग प्रवर्तले किंवा महाराष्ट्राचे 'इतिहास-मन' जागे झाले एवढे मात्र खरे.

यानंतर विष्णुशास्त्री चिपळूणकर, काशिनाथ नारायण साने, राजवाडे, न्या. रानडे, खरे, पारसनीस, रियासतकार सरदेसाई यांच्या इतिहासक्षेत्रातील कार्यासंबंधी येथे मुद्दामच सविस्तर चर्चा करीत नाही. कारण ते ते विषय मी शंकरराव देवांना समर्पित केलेल्या ग्रंथांत आटोपशीर रीतीने व मराठी वाङमयाचा इतिहास खंड ४ था या ग्रंथांत अमळ विस्ताराने मांडलेले आहेत. पण काही गुणदोषांचा उल्लेख करणे येथे प्राप्त आहे. न्या. रानडे यांनी आपल्या इंग्रजीतून दिलेल्या व्याख्यानांतून मराठ्यांच्या सतराव्या शतकांतील उठावास एक अखिल भारतीय तात्विक बैठक दिली व मराठ्यांचा उदय हा सह्याद्रीच्या

कडेपठारात अकस्मात लागलेल्या आगीप्रमाणे एकाएकी झालेली गोष्ट नव्हे हे दाखवून दिले. राजवाडे यांनी दैवी विचारांतून समाजास बाहेर काढून सामाजिक घटनांकडे भौतिक दृष्टीने कसे पहावे किंबहुना समाजाच्या उन्नतीस भौतिक दृष्टीच कशी महत्वाची आहे हे दाखवून दिले. एका अर्थी इतिहासास पुराणांच्या छापेतून बाहेर काढून तो वस्तुनिष्ठ परिभाषेत मांडला आणि त्याबरोबरच मराठ्यांचा उदय ही अकस्मात् घडलेली घटना नव्हे हे दाखवून दिले. अशा रीतीने त्यांनी मराठ्यांचा आपल्या इतिहासाविषयी अभिमान जागृत केला पण त्याबरोबरच मराठ्यांचा अहंकार फुलविण्यासही त्यांचे लेखन कारणीभूत झाले असे एकंदरीने म्हणावे लागते. कारण या अहंकारामुळे आपटे, गोखले, लिमये, देवधर असे एक एक घराण्या–घराण्यांचे इतिहास तयार होऊ लागले. काही काळ संशोधनाचे पेवच फुटले होते. त्यामागोमाग किंवा त्याबरोबरच जातींचा व उपजातींचा इतिहास अशीं पुस्तके तयार झाली व ती एकमेकांवर प्रच्छन्न किंवा उघडपणे टीका करू लागली. याच काळात धुळ्याचे शंकरराव देव यांनी समर्थ व त्यांचे शिष्य व त्यांचे सर्वांचे मठ यांचा शोध घेण्यासाठी व तेथील कागदपत्रे प्रसिद्ध करण्यासाठी महाराष्ट्रभर प्रवास केला. त्या सर्वांचा सूचित किंवा स्पष्ट निष्कर्ष असा की समर्थ हे शिवाजीचे धर्मगुरु तर होतेच, पण राजकीय गुरूही होते ! या निर्णयामुळे शिवाजीचे काहीसे अवमूलन व त्याचप्रमाणात समर्थाचे माहात्म्य वाढलें. हा प्रकार ब्राह्मणेतरांस तर रुचला नाहीच पण फाटकासारखे इतिहाससंशोधक या निर्णयाविरुद्ध दंड थोपटून उभे राहिले. फाटकांची कित्येक विधाने हट्टीपणाची असली तरी ज्याकाळात त्यांनी हे कार्य केले त्याकाळात ते निःसंशय धाडसाचे होते. राजवाडे, व खरे हे आपल्यापरी इतिहाससंशोधनात मोलाची भर घालीत असता, ना. कृ. गद्रे यांनी इ. स. १९१०चे सुमारास ‘सरस्वतीमंदीर’ मासिकांतून ‘महाराष्ट्र महोदयाचा पूर्वरंग’ याविषयावर लेखमाला लिहून ती ग्रंथरूपाने छापली. तीत ज्याप्रमाणे भारतातील जैन लिंगायत आदि समाजास, त्यांची दैवते कायम ठेवण्याचे स्वातंत्र्य राखून भारतीय समाजाने आत्मसात करून घेतले. तसा भारतीय हिंदूंना मुसलमाना-बाबत प्रयत्न करता येईल, हे गुरुचरित्रातील कथेच्या आधारे सूचित केले. पण त्याकाळी मुसलमानास वेगळे मतदार संघ मिळाले होते व त्यांना आपल्या वेगळेपणाचे राजकीय महत्त्व कळू लागले होते म्हणूनच इतिहासअभ्यासकांचे गद्रे यांच्या लेखनाकडे पुरेसे लक्ष वेधले गेले नाही, म्हणून तो विचार मागे पडला तो पडलाच. इ. स. १९१५-१६ नंतरच्या काळात पांडोबा पटवर्धन,








आबा चांदोरकर, पोतदार, द. वि आपटे यांसारखे त्या काळचे तरूण संशोधक पुढे आले. या काळांत हलकेहलके अभिमान, अहंकार या दोहोंच्याही छापेतून संशोधक हलकेहलके मुक्त होऊन त्यांनी राजवाडे यांच्या संदेशाचे फलित जे सत्यसंशोधन त्याचे महत्त्व जाणून जुन्या कागदपत्राच्या आधारे सत्य संशोधनास प्रारंभ केला. याचा अर्थ अभिमान अहंकार अजि-बात गेले असा नव्हे, हे शिवजन्मतिथी निर्णयावर झालेले वादविवाद व हमरीतुमरी यांची साक्ष देतील. पण संशोधकांस कळून चुकले की सत्य संशोधन म्हटले की त्यांत मतभेद होणारच व अशा चर्चेस वाव मिळाला पाहिजे. 'यासाठी भा. इ. स. मंडळाचे दरवाजे सतत खुले आहेत.' असे पोतदारांनी 'शिवचरित्रप्रदीप' या ग्रंथाच्या प्रस्तावनेत प्रांजळपणे म्हटले आहे द. वि. आपटे तर यापुढे अस्सल कागद मग तो मराठ्यांची भली वा बुरी कोणतीही बाजू दर्शविणारा असो, मंडळात आवर्जून वाचीत व त्यावर आपल्या नम्र, पण ठाम भाषेत विवेचन करीत. इतकेच नव्हे तर त्या काळी स्पेंग्लरचा 'डिक्लाईन ऑफ द वेस्ट' हा ग्रंथ प्रसिद्ध झाला होता व तो इंग्रजी जाणणाऱ्या इतिहासाच्या अभ्यासकांत खळबळ माजविणारा होता. त्याच्या विचाराचे स्वरूप त्यांनी सह्याद्रि मासिकांत लेखमालेच्या स्वरूपांत मांडून इंग्रजीतील इतिहासविषयक विचार मराठी वाचकास परिचित करून दिले. इ. स. १९२० ते ३० या दशकात महाराष्ट्रांत एकांडे म्हणून नांवाजलेले विद्वान ज्ञानकोशकार डॉ. श्री. व्यं. केतकर यांचे ज्ञानकोश खंड प्रसिद्ध झाले. त्यात प्रास्ताविक विचारात त्यांनी इंग्रजी विद्वानांच्या परंपरेतून विचार करणाऱ्या इतिहाससंशोधनास धक्का दिला व अस्सल भारतीय परंपरेतून इतिहासविचारांचे स्वरूप त्रोटक रीतीने मांडले. त्यांत एके ठिकाणी तर त्यांनी चक्क म्हटले आहे की आपण पूर्वी राजकीय घटनांना इतके महत्व देत नव्हतो. समजा की आजच्या काळात कोणा छबिलदास नामक कापड-व्यापाऱ्याने आपले दुकान विकून त्याच्याजागी कुणा छगनदासाने तेथे आपले दुकान घातले तर व्यापारी जगात काय थोडी खळबळ होत असेल ती होवो; पण सामान्य जनता छबिलदासाऐवजी छगनदासाकडून कापड विकत घेईल. कारण तिला कापड मिळल्याशी कारण! तसे संरक्षणाचा पुरवठा करणाऱ्या एका राजाच्या पेढीच्या जागी, कुणा दुसऱ्या राजाची पेढी आली तर सामान्य शेतकऱ्यास त्याचे काय होय? तो आपला सारा नियमितपणे देईल व सालो-साल आपल्या शेतांतून पीकपाणी काढील. डॉ. केतकरांनी या विचारांचा पाठ-पुरावा करून 'भारतीय इतिहासशास्त्रावर' एखादा स्वतंत्र छोटेखानी कां होईना

ग्रंथ लिहिला असता तर कदाचित इतिहासविचारास तो एक मोठाच धक्का मिळाला असता. पण एकंदरीत वाटते की प्राचीन इतिहासविषयक विचारापुरते हे काहीसे खरे असले तरी ते अर्वाचीन इतिहासास कितपत लागू करता आले असते याची शंका वाटते. इतकेच काय, पण त्यांचा महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासाचा जो प्रथम खंड त्यांनीच प्रसिद्ध केला आहे त्यातही त्यांनी आपली प्रतिज्ञा पुरेशी पाळलेली नाही. पुराणातून सत्य शोधून काढण्याची त्यांची धडपड आहे. इ. स. १९२६ नंतरच्या काळात महाराष्ट्रात बरेच इतिहाससंशोधन झाले. विशेषतः फारशी कागदपत्रे व त्यातील साधने यांचा प्रवाह मराठी कागदपत्राच्या साधनाबरोबर तुलना करावयास सापडला. तसेच शिवकालीन अस्सल कागदांचेही बरेच संशोधन झाले. जेथे जेथे तुलना व चिकित्सा सुरू होते तेथे संशोधनातून काही प्रबोधन होण्याचा संभव असतो परंतु तसे याबाबत विशेषसे घडून आले नाही. परंतु या काळात शंकरराव जोशी यांचे मराठी समाजव्यवस्थेवरील लेख जे 'मराठेकालीन समाजदर्शन' या पुस्तकात नंतर एकत्रित केले आहेत ते तत्कालीन समाजाचे स्वरूप सांगणारे आहेत. धनंजयराव गाडगीळ यांचा भा. इ. सं. मंडळात वाचलेला निबंधही प्रबोधक ठरणारा आहे. अगदी अलीकडे डॉ. अ. रा. कुलकर्णी यांनी शिवकालीन आर्थिक स्थितीवर जो निबंध प्रसिद्ध केला आहे : त्यांत प्रथमच इतिहास व अर्थशास्त्र या दोन्ही क्षेत्रातील विचारप्रवाह एकत्र आले आहेत व ते काही प्रमाणात प्रबोधनास उपयुक्त आहेत. अलीकडे मराठा हिस्ट्रीवर विद्यापीठातर्फे सेमिनार्स भरू लागल्या त्यात भारतातील दूरदूरच्या विद्यापीठातर्फे विद्वान येतात. व ते मराठ्यांच्या इतिहासावर प्रकाश टाकतात, पण हे निबंध अनेक कारणानी प्रबोधक ठरत नाहीत.

या धावत्या समालोचनात मराठीत लॉर्ड अॅक्टनसारखे विचारवंत किंवा टॉयन्बीच्या 'स्टडी ऑफ हिस्ट्री ( १२ खंड ) सारख्या जागतिक विविध संस्कृतींचे तुलनात्मक विवेचन करणारे ग्रंथकार तर राहोच पण पहिल्या महायुद्धानंतर 'जागतिक इतिहास' लिहिणाऱ्या एच. जी. वेल्ससारखा किंवा बिल् ड्युरांट सारखे ग्रंथकार मराठीत तर नाहीच, पण अन्य भारतीय भाषांतूनही झाले नाहीत. माझ्या या समालोचनात प्राचीन इतिहासाचे संशोधक व त्यांचे कार्य यांचे समालोचन अजिबात राहून गेले आहे याची मला जाणीव आहे. पण त्या क्षेत्रातील पुरेशा अभ्यासाच्या अभावी वाचकांची क्षमा मागून मी पुढे जात आहे.

इ. स. १८४४ साली महाराष्ट्राचे इतिहास मन जागृत झाल्यापासून, चिकित्सा, अभिमान जागृती, सत्यसंशोधन, व समालोचन या चार पद्धतीतून संशोधनातून प्रबोधनाची वाटचाल होत आहे. बाळशास्त्री जांभेकरांपासून रानडे–राजवाडे यांच्यापर्यंत चिकित्सक परीक्षण, राजवाड्यापासून ते दत्तोपंत आपटे यांच्यापर्यंत अभिमानजागृती, आपटे पोतदार यांच्यापासून सत्य संशोधन, व इ. स. १९४० नंतर संशोधित साधनांवर विमर्श करून त्यांतून काही समाजस्थितीचे संशोधन असा महाराष्ट्रांतील आजपर्यंतच्या संशोधनाचा साकल्याने आढावा घेता येईल. येथे हे पुनः सांगावयास नकोच की हे कालखंड एकमेकांपासून तुटल्याप्रमाणे नाहीत किंवा पुढील काळांत चिकित्सा किंवा अभिमानजागृती झालीच नाही किंबहुना मागील काळांतही समालोचन झाले नाही. असे समजण्याचे कारण नाही. इतिहाससंशोधकांचे कार्य आपापल्यापरी चालू असता इतिहासाच्या सामान्य वाचकाच्या अपेक्षा ज्या व्यक्त होत त्या संशोधक पुऱ्या करू शकले असे म्हणता येणार नाही. त्यातील एक म्हणणे असे की इतिहास नुसता राजकीय असण्यापेक्षा त्यात सामाजिक, धार्मिक, आर्थिक घटनांचाही उहापोह असावा, यापैकी सामाजिक घटनांचे दर्शन वा. कृ. भावे यांनी पेशवेकालीन महाराष्ट्रात करून देण्याचा यत्न केला पण त्यांत जुन्या गोष्टींच्या चिकित्सक परीक्षणांपेक्षा समर्थन करण्याची प्रवृत्तीच दिसून येते. इतर काही छोटेखानी पुस्तकातून पुस्तकाचे अखेरीस परिशिष्ट जोडल्याप्रमाणे सामाजिक, धार्मिक, आर्थिक अशी समालोचने आहेत. पण इतिहास हा असा परिशिष्ट जोडल्याप्रमाणे घडत नसल्यामुळे हे लेखन जुजबी झाले.

पहिल्या महायुद्धानंतरच्या काळात देशाच्या इतिहासात जागतिक घडामोडीची माहिती असावी अशी सामान्य वाचकास भूक निर्माण झाली व त्याबरहुकूम विद्यापीठीय व शालेय पुस्तके निघू लागली; परंतु अशोकाच्या इतिहासाशेजारी ग्रीस–देशाचा इतिहास लिहिला व ती प्रकरणे- एकमेकात चिकटवली तर पुस्तक तयार होईल पण त्याने प्राचीन जगताची व त्यातील घटनांची सामूहिक अशी माहिती येणार नाही. व तो जगाचा इतिहास होणार नाही म्हणून तोही प्रयत्न दिवसेंदिवस अपुरा वाटू लागला. सामान्य वाचकाच्या दृष्टीचे क्षितिज रुंदावत होते पण त्यास साद घालणारा कल्पक इतिहासकार या काळात कोणी पुढे आला नाही व त्यामुळे प्रबोधन झालेच नाही. स्वातंत्र्योत्तर काळात नव्या मतदार संघातून जे राज्यकर्ते पुढे आले

त्यांनी इतिहास हा भावी पिढीच्या शिक्षणाच्या संबद्ध असावा, या दृष्टीने लढायांचे तपशील वगैरे गाळून टाकावे. बाजीरावाने निजामाचा कोठे कोठे पराभव केला हे आपणास काय करायचे आहे ? एकदा सांगावे की बाजीरावाने निजामाचा अनेक वेळा पराभव केला व त्याला आपले डोके वर काढू दिले नाही. अशारीतीने हे सर्व थोडक्यात आटपावे. इतिहास, भूगोल व नागरिकशास्त्र हे विषय ' सामाजिक शास्त्रे ' या एका विषयात आणून त्याची एकच प्रश्न-पत्रिका करावी, असे धोरण आखले गेले, याने इतिहासाचा व इतिहास-संशोधनाचा कोंडमारा झाला. अर्थात त्यातून होणारे प्रबोधनतर दूरच राहिले. इकडे संशोधक आपले कार्य श्रद्धेने करीतच होते. सामान्य जनतेतील पुढाऱ्यापैकी कित्येकजण ऐतिहासिक घटनावर आपापल्यापरी पण निरा-धार भाष्ये करीत, पण ही भाष्ये प्रबोधनकारक नव्हेत हे लक्षात ठेवले पाहिजे. पुढील म्हणजे अगदी अलीकडील काळात ऐतिहासिक प्रवाह संक्षेपाने पण सुसंगत सांगण्यापेक्षा इतिहास शिकविताना पूर्वजांची विविध क्षेत्रांतील, म्हणजे तत्वज्ञान, शिल्प, व्याकरण, गायन, राजकारण, समाज-कारण इ. क्षेत्रातील कामगिरी तेवढी सांगून भारतीयांनी इंग्रजांपासून आपले स्वातंत्र्य कसे संपादन केले तेवढे मुलास शिकवावे असे सांगू लागले आहेत. असे इतिहास नामक ' सामाजिक शास्त्रात' तथाकथित तज्ञांनी अनेक प्रयोग चालविले आहेत. व त्यांत विद्यार्थ्यांच्या पिढ्या घुसळल्या किंवा विसळल्या जात आहेत. येथे इतिहासशास्त्राला, त्याच्या संशोधनाला किंवा त्यापासून होणाऱ्या प्रबोधनाला काहीच वाव नव्हता.

एकीकडे तरुण पिढीवर हे प्रयोग चालू असता दुसरीकडे पारंपरिक इतिहाससंशोधक आपले प्रबोधनशून्य संशोधन नेहमीच्या पद्धतीने चालवीत असता, सुमारे ३५ वर्षांपूर्वी ( इ. स. १९३८ ) शं. द. जावडेकर यांनी आपला ' आधुनिक भारत ' हा ग्रंथ प्रसिद्ध केला व त्यात, गेल्या शंभर वर्षात भारतात होत असलेले आर्थिक, सामाजिक, व राजकीय स्थित्यंतर कसे झाले हा विचार साकल्याने मांडला. ' गीतारहस्यानंतर मराठी भाषेस मिळालेली देणगी ' या शब्दांत तत्त्वचिंतक वामन मल्हारांनी या ग्रंथास गौरविले आहे. या ग्रंथांतील त्या वेळच्या विद्यमान राजकारणावरील जावडेकरांचे विवेचन व प्रासंगिक वर्तमानपत्री पद्धतीच्या कोपरखळ्या सोडून, निव्वळ ऐतिहासिक भागाकडे पाहिले तर हा ग्रंथ निःसंशय या गौरवास पात्र असाच आहे. दुर्दैवाने पारंपरिक संशोधकांनी तिकडे दुर्लक्षच केले. त्यांतील वडीलधारे जे होते त्यांनी त्या ग्रंथास-बहुधा तो वर वर वाचून आशीर्वादपर ' बरे ' म्हटले.

पारंपरिक आपल्या क्षेत्रात गुंग होते. तरुण, पारंपरिकांच्या छापेखाली होते व वृत्तपत्रीय टीकाकार त्या ग्रंथांतील टीकास्पद विधाने हाती घेऊन पक्षाभिमानाने उलटसुलट चर्चा करू लागले. त्या ग्रंथांतील इतिहासविषयक व्यापक दृष्टीकडे कुणाचेच लक्ष गेले नाही. वास्तविक जावडेकरांच्या ग्रंथातील राजकीय, सामाजिक, धार्मिक, आर्थिक, अशा प्रत्येक भागावर स्वतंत्र ऐतिहासिक प्रबंध लिहिता येतील पण तसे होऊं शकले नाही.

यावर कोणी असे विचारील तर मग ज्यांना मी पारंपरिक (traditional) इतिहाससंशोधक म्हणतो त्यांनी कशाप्रकारे संशोधन करावे की ज्यायोगे प्रबोधनाचा मार्ग दिसू लागेल. यावर माझे उत्तर असे की फुटकळ ऐतिहासिक शोध घेणे यापुढे पुरेसे नाही. सामाजिक गतिमान जीवनाचा अन्वयार्थ कागदपत्रांच्या साह्यांनी लावण्याच्या उद्योगास आता लागले पाहिजे. उदाहरणार्थ, मध्ययुगीन मराठे कालीन महाराष्ट्रांत 'वतन' ही एक महत्वाची सामाजिक संस्था होती. आज असतील ती थोडीफार वतने, वर्षासन किंवा इनामरूपाने आहेत एरवी त्यांचे अस्तित्व अस्तंगत झाले आहे. अशा वतनाचे शेकडो कागद आजवर साधनरूपाने प्रसिद्ध झाले आहेत त्यात शिवकालापासून इंग्रजी अंमलाच्या पूर्वार्धापर्यंतचे अनेक कागद आहेत, या नुसत्या फुटकळ कागदांच्या प्रसिद्धीवर संतुष्ट न राहता शिवकालापासूनच्या पुढील दोनशे वर्षात वतनदारीमध्ये किंवा त्याकडे पहाणाऱ्या समाजाच्या वृत्तीमध्ये फरक झाले असतील किंवा नसतील त्यांची दखल घेणे अवश्य आहे. वतनांचे विविध प्रकार आहेत. देशमुखी, पाटिलकी, महारकी, इतकेच काय पण बारा बलुतेदारही वतनदारच होते. यांत एखादा बलुतेदार किंवा वतनदार दिवसेंदिवस कमी अधिक महत्वाचा वाटत गेला असला पाहिजे असा समाजाच्या गतिमान जीवनाचा वेध घेणे हे प्रबोधनास अवश्य आहे. तसेच पूर्वी पैसा हे विनिमयाचे साधन अगदी आवश्यक तेवढेच वापरले जाई. एखाद्या घर-गड्यास पगारादाखल जेवण, सणास पागोटे व नजीकच्या जमिनीचा तुकडा नांगरटीस किंवा कोंबड्या पाळावयास दिला तर पुरे होई. आता सर्व मासिक पगार, स्केल, बोनस वगैरेवर प्रकरण आले आहे हे बदल कसकसे होत गेले? याचा शोध घेणे जरूर आहे. पूर्वी भागीदारीत व्यापार व्यवहार होत. अजूनही थोडाबहुत होतोच पण आता लिमिटेड कंपन्या, शेअरहोल्डर्स, डायरेक्टर्स यांचा काळ आला आहे हे स्थित्यंतर कसे होत गेले? पूर्वी 'स्वामिभक्ति' हा एकमेव निष्ठेचा विषय असे. मराठ्यांकडे स्वामिभक्त सरदार असत तसे निजामाकडेही असत. तो मुसलमान होता

या प्रश्नाकडे दुर्लक्ष केले जाई. आता स्वामिभक्तीच्या ऐवजी देशभक्ति, किंवा राष्ट्रनिष्ठा या गुणाने मूळ धरले आहे. पूर्वी म्हणजे पहिल्या महायुद्धात 'हरहर महादेव,' 'शिवाजी महाराज की जय' अशा जाहिराती देऊन इंग्रज राज्यकर्ते मराठा व महार पलटणी स्वसैन्यात दाखल करीत. टिळकांनी शिवाजी महाराज हे राष्ट्राच्या अभिमानाचे स्फूर्तिस्थान म्हणून निर्माण करण्याचा प्रयत्न केला. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत शिवाजी हे संयुक्त महाराष्ट्राचे प्रतीक बनले. या स्थित्यंतरात ऐतिहासिक महापुरुषांचे वास्तविक स्थान व त्यांचा राजकारणात उपयोग हे संशोधकाच्या संशोधनाचे विषय नाहीत काय ?

असेच विविध बदल कौटुंबिक जीवनात घडून येत आहेत. पूर्वी कौटुंबिक दाढर्च असे. याचा अर्थ मुले वयात आली तरी वडिलांच्या छत्राखाली एकत्र राहात. किंवा वडिलांच्या मृत्यूनंतर वडील मुलास त्यांचे वडिलकीचे स्थान प्राप्त होई. आता पूर्वीचे कौटुंबिक दाढर्च राहिले नाही. शिस्तीपेक्षा स्वातंत्र्य अधिक प्रिय वाटू लागले आहे. पूर्वीचे भावाभावातील प्रेमळ संबंध आता तसे व तितके राहिलेले केवळ अपवादभूत म्हणूनच दाखविता येतील. हे स्थित्यंतर कसकसे घडून आले हे विविध कौटुंबिक पत्रे कालवार एकत्र करून त्यातील होत गेलेले फरक व त्याची कारणे शोधण्यासारखी आहेत. मला वाटते याच पद्धतीने बालविवाह–प्रौढविवाह–प्रेमविवाह, विधवाविवाहास विरोध, उदासीनता, मूक संमति–प्रकट संमति, लग्नकार्यातील व इतर मंगल कार्यातील मान-पानांच्या हक्कात होणारे बदल किंवा त्याकडे पहाण्याची दृष्टी इतकेच काय स्त्रीपुरुषांच्या पेहरावात होत गेलेले क्रमशः बदल यांचा मागोवा घेत गेल्यास इतिहास हे खरोखर सामाजिकशास्त्र होईल. तसेच पूर्वी जाती होत्या व आजही त्या राजकीय मान्यता नसताही अस्तित्वात आहेत पण पूर्वी जातिनिष्ठा असताही जातिमत्सर नसे; आज तो अधिकाधिक तीव्र व अनिष्ट स्वरूप धारण करीत आहे. या दृष्टीत होत गेलेले बदल अभ्यसनीय आहेत. निव्वळ ऐतिहासिक विषयातही प्रबोधनात्मक संशोधन करता येईल. एखाद्या आधुनिक लष्करी तज्ज्ञाने मराठ्यांच्या स्वाऱ्या, शिपाई, स्वाऱ्यांचे मुक्काम, लढायांची व्यूहरचना, मिळालेले विजय त्यातून उपलब्ध झालेले फलित व त्यावरून निघणारे त्यांचे निष्कर्ष यांचा अभ्यास करण्यासारखा आहे व त्यात या विषयातील एखाद्या तरुण इतिहास अभ्या-

सकास साह्य म्हणूनही त्यास घेता येईल. तीच गोष्ट नाविक व आरमारी लढायाबद्दलही म्हणता येईल. याच पद्धतीने एखाद्या वैद्यकशास्त्रनिपुणाने पूर्वीच्या ऐतिहासिक व्यक्तींचे आजारीपण व लागू पडलेली किंवा न पडलेली औषधे व उपचारपद्धती यांचा कालक्रमवार अभ्यास साधनांच्या साह्याने करता येईल. पूर्वी 'राजा' व राजकुल ही संस्था पवित्र मानली जाई. त्यास पृथ्वीपती म्हणत. महाभारतात 'राजा चेत् न भवेत् लोके पृथिव्याम् दण्डधारकः । जले मत्स्यान् इव अभक्ष्यन् दुर्बलान् सबला इव ।। असे म्हटले आहे. यास 'मात्स्यन्याय' म्हणतात. आता राजा ही संस्थाच कालबाह्य ठरली आहे. हा बदल कसकसा होत गेला ? पूर्वी परमेश्वराने ( ब्रह्मचाने ) सृष्टि निर्माण केली, असे भारतीय धर्मशास्त्रात सांगितले जाई आता 'देव' ही कल्पनाच मनुष्यनिर्मित आहे असे म्हणण्यापर्यंत कवि केशवसुतांची मजल गेली व या मतास दिवसेदिवस अधिक अनुयायी मिळत आहेत. पूर्वी संकटसमयी देवाला नवस करणे, देवाला साकडे घालणे यावर दृढ विश्वास असे व लोक नाना चमत्कारांवर खुशाल श्रद्धा ठेवीत. अजूनही बहुजनसमाज तसाच आहे. पण आता अनेकास हे निश्चित कळून चुकले आहे की त्या त्या शास्त्राच्या अनुरोधाने प्रयत्न केल्यावाचून संकटे दूर होणार नाहीत किंबहुना काही संकटांस धैर्याने सामुदायिकरीत्या तोंड दिल्यावाचून गत्यंतर नसते अशीच ही सृष्टिरचना आहे. अशी वास्तव दृष्टि निर्माण झाली. पूर्वी ब्राह्मण व त्यांनी म्हटलेले मंत्र हे फार पवित्र समजले जात. आता जोतिराव फुल्यांनी "सर्वसाक्षी जगत्पती । त्याला नकोच मध्यस्थी ।। असे स्वच्छ म्हणून ब्राह्मणांचे पावित्र्य हे बाजूस सारले आहे. पूर्वी खऱ्या देवाचा शोध घेण्यासाठी दादोबा पांडुरंग, आत्माराम पांडुरंग, राम जयकर, न्या. रानडे यांनी अनेक प्रयोग केले व त्या अनुरोधाने प्रार्थनासमाज स्थापन केला आणि धर्मतत्वांचा व धार्मिक आचारांचा शोध घेतला. आज ती संस्था तशी सतेज व कार्यक्षम राहिलेली नाही. या बदलांचा शोध घेणे व त्यांची मीमांसा करणे हे अतिशय आवश्यक आहे.

आजचे भारतीय राजकारण हेही कितीतरी बदलले आहे. पूर्वी अगदी मराठेकालीन राजकारणात, परराष्ट्रीय राजकारणाची तर राहोच पण परकीय आल्यागेल्यांची 'जितक्यापुरती तितकी वास्तपुस्त' होत असे. खरोखर जागतिक राजकारणाचे पडसाद भारतीय राजकारणावर यापूर्वीच काही शतके आदळत होते पण येथील मोगल वा मराठे राज्यकर्त्यांनी त्यांची फारशी दखल घेतली नाही. आता परराष्ट्रीयसंबंध हे राजनीतीचे एक महत्वाचे अंग होऊन

बसले आहे. तसेच पूर्वी अर्थव्यवहारांचा राजकीय व्यवहारावर काय अप्रत्यक्ष परिणाम होत असेल तो होवो पण पूर्वीचे राजकारण अर्थमूलक नव्हते. आज अर्थव्यवहार हे राजकारणाचे महत्वाचे अंग झालेले आहे. एके काळी उदार-मतवादातून निर्माण झालेल्या खुल्या भांडवलशाहीच्या तत्वाने अर्थव्यवहार चालत. त्याच्या नफेखोरीचे दुष्परिणाम लक्षात घेऊन अनेक पर्यायानंतर समविभाजनवादी समाजवादाचा पुरस्कार करणारा पक्ष पुढे आला. मध्यंतरी पं. जवाहरलाल नेहरूंनी सहकारवादाचा व मिश्र अर्थव्यवस्थेचा पुरस्कार केला. आता ज्यांची समाजवादावर अढळ श्रद्धा होती व अजूनही असेल तेही भविष्यकाळात समाजवादाच्या भविष्याविषयी निराशेने व हताशपणे बोलू लागले. सहकाराचा बोजवारा उडाला व भांडवलशाही अजून बद्धमूल असली तरी जनतेच्या मनातून ती उतरली आहे. असो, भारतापुरते बोलावयाचे तर आता आमचा कोणत्याही 'इझम्' वर विश्वास उरला नसून काहीशा घुटमळलेल्या अवस्थेत भविष्यकाळाकडे आपण पहात आहोत. आजचा सामान्य मनुष्य भारतात तरी धंदेवाईक जीवनात नफेखोरी करतो. व्यापारी आपसात सहकार करतात, कुटुम्बात साम्यवादी पद्धतीने म्हणजे कोणाचे श्रम किती यावर त्यास मिळणारे फायदे न वाटता कष्ट करून मिळवावे व गरजेनुरूप उपभोग घ्यावा या तत्त्वावर वागतो व प्रतिपादनात मात्र समाजवादी समविभाजनाचे तत्त्व प्रतिपादतो असा दुटप्पी किंवा तिटप्पीच नव्हे तर चौटप्पी बनला आहे ! भारतात होत असलेले हे आर्थिक दृष्टिकोनातील बदल पूर्वकालापासून मांडीत जाणे याचाच अर्थ, आर्थिक इतिहास कागदपत्रांचे पुरावे देऊन मांडणे अवश्य आहे.

वर मी अनेक उदाहरणे व विषय दिले असे आणखी अनेक विषय असतील व आहेत. किंवा त्यातील सर्वच विषयांवर ऐतिहासिक संशोधन होऊ शकेल, असेही नसेल. पण माझ्या प्रतिपादनाचा रोख असा की आता इतिहास-संशोधनाने भूतकाळाचे संशोधन करीत असता ( १ ) आता वर्तमानकाळाचे भान राखावे व ( २ ) समाजाच्या गतिमान जीवनाच्या अनेक अंगांचा शोध घ्यावा ही एक संशोधनातून प्रबोधन होण्याची दिशा आहे. एरवी संशोधन हे संचित जलाशयातून थोडेबहुत पाणी काढून त्याच्या गुणदोषांवर होणारे भाष्य ठरेल. व तेवढ्यापुरते ते भाष्य उपयुक्त असले तरी त्याने प्रबोधन होणार नाही.

डॉ. गणेश थिटे

# प्राचीन भारतीय वृक्षवैद्यकशास्त्र

## प्रस्तावना–

प्राचीनकाळी भारतात वृक्षांना फार महत्त्व दिले जाई. वृक्षांना त्यांच्या भौतिक उपयोगितेमुळे धर्मनिरपेक्ष ( सेक्युलर ) असे महत्त्व होतेच पण त्याहूनही अधिक म्हणजे त्यांना यातुधर्मात्मक ( मॅजिकोरिलिजियस् ) असे महत्त्व दिले जाई. वृक्षांना सर्व सुखांचे साधन मानले आहे. ( शाङ्र्गधरपद्धति २०८२ ). त्याचप्रमाणे वृक्ष हे धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष ह्या चार पुरुषार्थांचे साधन आहेत अशीही त्यांची स्तुती केली गेली आहे. ( शाङ्र्ग. २०८५ ). राजाचे तारुण्य, सुंदर स्त्रिया, कलावित मित्र, मधुर वाद्यध्वनी, सर्व धन हे जर विहारोपवने नसतील तर व्यर्थ होय ( शाङ्र्ग. २०८६ ). पुत्र असण्यापेक्षाही वृक्ष असणे अधिक श्रेष्ठ मानले गेले आहे. एक वृक्ष हा दहा पुत्रांशी तुल्य मानला गेला आहे ( दशपुत्रसमो द्रुमः शाङ्र्ग. २०८६ ). अशा प्रकारचे वृक्षमाहात्म्य हे राजाला उपदेशिले जात असे; आणि वृक्ष लावणे, वाढविणे, त्यांचे रोग बरे करणे हीही माहिती एक राजाला उपयोगी विद्या ह्या दृष्टीने त्याला ती शिकवली जाई हे लक्षात घेण्याजोगे आहे.

## वृक्षारोपणाचे फळ

वेगवेगळ्या वृक्षांच्या आरोपणाचे वेगवेगळे फळ सांगितले गेले आहे. उदाहरणार्थ तुळस लावली असता ती जितकी वर्षे घरात राहील तितकी हजार वर्षे लावणारा वैकुंठात राहतो ( शाङ्ग.र्ग. २०८९ ). जो बिल्ववृक्ष लावील त्याच्या घरात सदैव लक्ष्मी नांदेल ( शाङ्ग.र्ग. २०९० ). जो दोन वटवृक्ष लावील तो अप्सरांकडून सेवा घेत शिवलोकात राहील. तीन निम्बाची झाडे लावल्यास तीन अयुत वर्षे सूर्यलोकात राहण्यास मिळते. चार प्लक्षवृक्ष लावल्यास लावणाऱ्याला राजसूय यज्ञाचे फल मिळते. ( शाङ्ग.र्ग. २०८९ व पुढे ).

अनुक्रमणिका

**वृक्षारोपण-**

अशा रीतीने वृक्ष लावणे हे एक पुण्यकर्म मानले गेले आहे. अर्थातच वृक्ष लावणे ही एक साधी लौकिक कृती नसून ते एक यातुधर्मात्मक कर्मकांड (रिच्युअल) आहे. त्याबाबत अर्थातच अनेक प्रकारचे नियम, वर्ज्यावर्ज्य कल्पना आहेत.

**दिशा-**

कोणत्या दिशेला कोणते वृक्ष लावावेत ह्यासंबंधी पुढीलप्रमाणे नियम आहेत. घराच्या पूर्वबाजूला न्यग्रोध वृक्ष लावावा. दक्षिणेला उदुंबर लावावा. पश्चिमेला पिप्पलवृक्ष शुभ असतो. उत्तरेला प्लक्ष वृक्ष पुण्यकारक ठरतो. ह्यांहून वेगळ्या दिशांना हे वृक्ष लावणे टाळावे. घराच्या पूर्वेला अश्वत्थ लावू नये. दक्षिणेला प्लक्ष लावू नये. पश्चिमेला न्यग्रोध आणि उत्तरेला उदुंबर लावू नयेत. (शार्ङ्ग. २१०५-२१०६; तुलना करा- अग्निपुराण २८२·१; विष्णुधर्मोत्तरपुराण २·३०·१-२ ).

**वर्ज्य वृक्ष**

बदरी, कदली, दाडिमी, बीजपूरक हे वृक्ष ज्या घरात वाढतात ते घर वाढत नाही. त्यामुळे ते वृक्ष वर्ज्य आहेत. पलाश, काञ्चनार, श्लेष्मातक, अर्जुन हे वृक्ष लावल्याने सुख नष्ट होते. क्षीरवृक्ष हे अर्थनाशास कारणीभूत होतात. तसेच नीली, हरिद्रा, हे वृक्ष पुत्र व धन ह्यांचा नाश करणारे ठरतात (शार्ङ्ग. २१०९-२१११). शाल्मली, कोविदार, बिभीतक, दमन, देवदारु, पुष्कर हेही वृक्ष वर्ज्यच आहेत. (विष्णुधर्मो. २·३०·१२).

**मंगल वृक्ष-**

फलिनी (प्रियङ्गु), अशोक, पुंनाग, निम्ब, चंपक, मल्लातक हे वृक्ष मंगल असून ते प्रथम लावावेत (शार्ङ्ग. २१५०).

**वृक्षारोपणाची नक्षत्रे-**

उत्तरा, रोहिणी, मृगशीर्ष, रेवती, चित्रा, अनुराधा, मूल, विशाखा, पुष्य, श्रवण, अश्विनी, ह्या नक्षत्रावर वृक्षारोपण करावे (बृहत्संहिता ५५·३१; तुलना करा- अग्निपुराण २८२·३-४).

**भूमि-**

जांगल, अनूप, आणि सामान्य असे भूमीचे तीन प्रकार आहेत. शिवाय रंग आणि रस ह्यावरूनही भूमीचे प्रकार पाडले असून ते सहा आहेत.

अनुक्रमणिका

काळी, पांढुरकी, श्यामल, तांबडी, पांढरी, पिवळी, ह्या रंगाची जमीन अनुक्रमे गोड, आंबट, खारट, कडू, तिखट, तुरट असते. विष, दगड–गोटे, वारुळे बिळे इत्यादींनी दूषित झालेली, तसेच खारी जमीन, पाणी दूर असलेली जमीन, तसेच वाळूने युक्त अशी जमीन वृक्षांना हितकारक नसते. पोपटाच्या पंखाप्रमाणे मऊ, शंख, कुंद, कुमुद, ह्यासारखी दिसणारी, तापव-लेल्या सोन्याच्या रंगाची, किंवा उमलत्या चाफ्याच्या रंगाची जमीन चांगली. ती सम असावी. तिला पाणी जवळ असावे. तिच्यावर वृक्षांचे व गवताचे हिरवे अंकुर असावेत. अशा जमिनीवर वृक्ष चांगले वाढतात. जांगल व अनूप ह्या दोन्ही प्रकारच्या जमिनी वृक्षांना अयोग्य असून सामान्य भूमिच चांगली. तिच्यावर सर्व प्रकारचे वृक्ष वाढतात. निधि, देव, आणि राजे ह्यांच्या प्रभावामुळे आणि खूप प्रयत्न केले असता सात्म्य नसलेल्या भूमीवरसुद्धा वृक्ष वाढतात ( शाङ्र्ग. २११५– २१२०; २१२३ ). येथे आपणास वृक्षांच्या वाढीसाठी चांगल्या जमिनीपेक्षा यातुधर्मात्मक शक्तिद्रव्यांना जास्त महत्त्व आहे हे दिसून येईल.

### एकमेकांपासून अंतर–

दोन वृक्षामधील अंतर वीस हात असावे हे उत्तम. सोळा हात असणे मध्यम. पण निदान कमीत कमी बारा हात मात्र असावेच. जर एकमेकाना चिकटून अतिशय जवळ असे वृक्ष असतील तर ते फळे न धारण करणारे होतात ( विष्णुधर्मो. ३.३०.१५–१७; तुलना अग्निपुराण– २८२.९ ). वृक्ष लावताना त्यांच्या वेगवेगळ्या रचना कराव्यात. काही मंडपाकार लावावेत; काही नन्द्यावर्त, स्वस्तिक, चतुरस्र, सर्वतोभद्र, ह्या आकृतींचे, काही रांगेत, काही गटागटाने, आणि काही ठिपक्या-ठिपक्यासारखे लावावेत ( शाङ्र्ग. २१४५ ). ह्या आकृत्यांमध्ये अर्थातच काही सौंदर्यशास्त्रीय दृष्टी असू असेल. पण त्याही-पेक्षा अधिक म्हणजे त्या त्या आकारांना काही यातुधर्मात्मक अर्थ असणे अधिक शक्य आहे.

### वृक्ष लावतानाचे कर्मकांड

वृक्ष लावण्यापूर्वी ब्राह्मणांची पूजा करावी असे अग्निपुराणात सांगितले आहे. ( २२८.३ ) शाङ्र्गधरपद्धतीत असे सांगितले आहे की वृक्ष लावणा-ऱ्याने ( म्हणजे राजाने ) प्रथम स्नान करून पवित्र व्हावे ( तुलना– बृह-त्संहिता ५५.८ ) स्वच्छ वस्त्र नेसून देवांची पूजा करावी. गुरूला नमस्कार करावा. गुणवान् ( ब्राह्मणांना ) धन किंवा पृथ्वी दान करावी. वास्तुपुरुषाचे

स्मरण करून त्याने काही काही बीजे पेरावीत. त्यानंतर त्याच्या परिजनांनी पुढील पेरणीचे काम करावे. ( २१३६)

## वृक्षांची वाढ

वृक्ष नुसते लावून काम पूर्ण होत नाही. त्याची व्यवस्थित वाढ, पोषण होणे अतिशय महत्त्वाचे आहे. कारण झाडांना चांगली फुले, फळे येणे हे झाडांच्या पोषणावरच अवलंबून आहे ( शाङर्ग. २२२८ ). खजूर, बिल्व, लकुच, ह्यांना पांढरी मोहरी घातल्यास ते वाढतात. आंब्याची झाडे पिण्याका-मुळे आणि तुषयुक्त पाण्याने वाढतात. नारिंगाची झाडे निचुल वृक्षाच्या पानांनी युक्त असे पाणी शिपडल्याने आणि तांदूळ, मास ह्यांनी युक्त असे पाणी घातल्याने वाढतात ( २२२९). प्राचीनामलक वृक्षाला उडीद आवडतात. लहान तिन्दुकवृक्षाला दूधयुक्त पाणी हितकर ठरते. सखल भूमी सर्वच वृक्षांना आवडते ( २२३० ). तूप, शेण, वचा, वराहविष्ठा, ह्यांनी युक्त असे पाणी डाळिंबाला अतीव हितकर ठरते. शफरीवृक्षाला कुळथाचे पीठ ज्यात उकळले आहे असे पाणी वृद्धिकर ठरते ( २२३२ ). लहान झाडे खूप वाढण्यास पुढील उपाय उपयुक्त आहे. मातीने युक्त अशा तुपाचा धूप देणे, यवयुक्त पाणी शिंपडणे, तसेच दुग्धयुक्त पाणी व शेणयुक्त पाणी शिंपडणे, वावडिंग, तीळ ह्यांच्या लगद्याचा लेप देणे हे उपचार केले असता लहान वृक्ष मोठे होतात. ( २२४७ ) विष्णुधर्मोत्तरपुराण (२·३०·२२) आणि अग्निपुराण (२८२·१३) ह्यांच्या मते मासळीयुक्त पाणी झाडाला घातल्याने झाडांची वाढ चांगली होते.

## केवड्याची सुगंधी पाने

केवड्याला सुगंधी पाने यावीत म्हणून उन्हाळ्यात सुगंधी पाणी केवड्याला घालावे आणि पावसाळ्यात शेणाने युक्त पाणी घालावे. ( शाङर्ग. २२४३ )

## फुले, फळे यावीत ह्यासाठी युक्त्या

झाडांना फुलेफळे यावीत ह्यासाठी अग्निपुराणात ( २८२·११ ) पुढील युक्ति सांगितली आहे. तूप व थंड पाणी यांचे सिंचन करावे. मेंढ्याची विष्ठा, यवाचे पीठ, तीळ, गोमांस व पाणी सात दिवस एकत्र ठेवून ते पाणी झाडांना घालावे म्हणजे झाडांना पुष्कळ फुले-फळे येतात (तुलना-विष्णुधर्मो. २·३०·२०)

झाडांना फुले व फळे यावीत यासाठी विष्णुधर्मोत्तर पुराणात विविध-प्रकारचे "दोहद ( डोहाळे ) करावयास सांगितले आहेत. उदाहरणार्थ मांसांनी

युक्त असे थंड पाणी आंब्यास आणि द्राक्षवेलीस घालावे ( २.३०.२३–२४ ). शिजवलेले रक्त डाळिंबाला चांगले ( २४ ) भव्य नावाच्या वृक्षाला तूस घालावे. बकुलवृक्षाला मद्य द्यावे. विशेषतः सुंदर स्त्रियांच्या मुखातील मद्य बकुलाला पोषक ठरते ( २५ ). अशोकवृक्षाला सुंदर स्त्रीने मारलेली लाथ आवडते. नारंग आणि अक्षोट वृक्षांना कोल्ह्याच्या मांसाने युक्त असे पाणी हितकारक ठरते ( २६ ). बोरीच्या झाडाला ज्येष्ठमधयुक्त पाणी चांगले (२७). सुगंधयुक्त पाणी आणि गोमांस कतकवृक्षाला उपयोगी आहे ( २७ ). सप्तपर्णवृक्षाला दूध घातल्याने तो मनोहर होतो (२८). कोरांटीला मांस, चरबी व मज्जा घालावी. कुजलेल्या मासळीनेयुक्त असे घृत व कुजलेली कापसाची बोंडे अरिमंद वृक्षाला आणि पाटलवृक्षाला घालावीत ( २९ ). कवठ आणि बेल ह्या वृक्षांना गूळपाणी घालावे ( ३० ). जाई आणि मल्लिका ह्यांना सुगंधी पाणी फार हितकर ठरते (३०) कुब्जक जातिवृक्षाला कासवाचे मांस घालावे (३१). खजूर, नारळ, वेळू, कदली, ह्या वनस्पतींना मीठयुक्त पाणी घालावे ( ३१–३२ ). तांदूळ, वावडिंग, मासे, आणि मांस सर्वच वृक्षांना दोहद म्हणून घालावेत ( ३२ ) अशाप्रकारे दोहद पार पाडल्यावर वृक्षांना सुंदर पाने, व सुगंधी फुले येतात. तसेच ते निरोगी रसपूर्ण, दीर्घायुषी, व फलयुक्त होतात ( ३३ ).

वर बकुल आणि अशोक ह्या वृक्षांच्या संदर्भात काही यात्वात्मक (जादू-टोणा) ह्या प्रकारच्या दोहदांचा उल्लेख आला आहे, शिवतत्त्वरत्नाकरामध्ये* ह्या प्रकारचे आणखी काही दोहद आले आहेत, स्त्रीच्या आलिंगनामुळे कोरांटीचा वृक्ष, पाहण्यामुळे तिलकवृक्ष, हस्तस्पर्शाने माकन्दवृक्ष, मदरागामुळे चाफा, बोलण्यामुळे कर्णिकार, मुखानिलामुळे सिंधुवार, गाण्यामुळे प्रियालु, आणि हसण्यामुळे नमेरूवृक्ष फुलतो (६.११,९५-९६).

झाडांना फुले व फळे यावीत म्हणून शाङ्‌र्गधरपद्धतीत विविध प्रकारच्या युक्त्या करावयास सांगितल्या आहेत. दही, दह्यातील पाणी, कांजी, दारू, बोरे, तीळ, मेथी, शेण, सीधु , दूध, ह्या गोष्टी फलिनी, कदंब, करिकेसरक ह्या

---

* प्रस्तुत लेख बहुतांशी लिहून झाल्यावर प्रा. ग. ह. खरे ह्यांनी शिवतत्त्वरत्नाकर हा ग्रंथ पाहण्याची सूचना केली. त्यातील वृक्षवैद्यक शास्त्रीय मजकुर प्राय: शाङ्‌र्गधरपद्धतीतील मजकुरासारखाच आहे असे तो ग्रंथ पाहिल्यावर आढळले. प्रा. खरे ह्यांना त्यांच्या सूचनेबद्दल धन्यवाद.

वनस्पतींना घातल्यास त्यांना खूप सुगंधी फुले येतात (२३३४). झाडाची फांदी कातडे व गवत ह्यानी बांधून तिला वावडिंग, मध, व दूध ह्यांचा लेप द्यावा. तसेच दूध व पाणी त्या झाडाला घालावे. म्हणजे उशीरा का होईना त्या झाडाला पक्व फळे येतात (२२८७). वाळलेले बी राखेत मिसळून मग पेरावे. त्यामुळे लवकर फळे येतात (२२९१). डाळिंबाचे बी त्याला कोंबड्याचे रक्त एकवीसवेळा माखून पेरावे; म्हणजे लवकर फळे येतात (२२९२). कुठलेही बी मासे, डुकरांची चरबी व मास, हरबऱ्याच्या डाळीचे पीठ व मीठ ह्यांनी माखून पेरल्यास त्याला नक्की फळे व फुले येतात (२२९३). कुळीथाच्या काढयाचे पाणी कुठल्याही झाडाला घातले असता त्याला फळे; फुले येतात (२२९३). तसेच पळस, अर्जुन, शिसवा, व मीठ ह्यांचे पाणी शिंपडल्यानेही झाडाला फुले व फळे येतात (२२९५). एखाद्या मन्दाराच्या झाडाच्या ढोलीतून कौष्माण्डी लता बाहेर पडली असेल तर त्या झाडाला माती, शेण व तूप घालावे. म्हणजे त्या लतेला नेहमी चांगली फळे येतात (२३००). एरंडाचे किंवा करंजाचे बी डुकराच्या रक्ताने, चरबीने आणि अंकोलाच्या तेलाने माखून पेरले असता त्याला चांगली फळे येतात (२३०१). आंब्याला सर्व ऋतूत फळे यावीत ह्यासाठी पुढीलप्रमाणे युक्ती करावी. आंब्याची कोय ससा व कासव ह्यांच्या रक्तात माखून पेरावी. झाड उगवले म्हणजे त्याला दूध घालावे (२३०७). एकेकाळी फुले व फळे येऊन गेलेल्या व नंतर वंध्य झालेल्या झाडाला पुनः फुले व फळे यावीत ह्यासाठी त्याला शेणयुक्त पाणी घालावे म्हणजे तो फळतो (२२७०). अग्निपुराणानुसार (२८२.१०) झाडाचा फलनाश झाला असता त्याला वावडिंगयुक्त घृताचा लेप देऊन कुळीथ, उडीद, मूग, यव, तीळ ह्यांनी युक्त असे पाणी घालावे (तुलना करा २.३०. १९).

एका झाडाला दुसरी फळे यावीत ह्यासाठी पुढील प्रकारच्या युक्त्या आहेत. डुकराचे मांस व मेद आणि अंकोलाचा काढा कदलीला घातल्यास तिला उत्तम डाळिंबे येतात (२३०३). केळीच्या झाडाला माणसाचे मांस, वसा, रक्त, व हत्तीच्या दाताचे चूर्ण ह्यांनी मिश्रित असे पाणी घातल्यास त्याला आंब्याची फळे येतात (२३०४). फळे येण्याबाबत आणखीही काही चमत्कार घडवून आणता येणे शक्य आहे. उदाहरणार्थ कडुलिंब हा स्वभावतःच कडू असला तरी पुढील युक्तीने त्याला गोड फळे आणता येतील. कृमिरिपु (एका वनस्पतीचे नाव), यव, ज्येष्ठमध गूळ, दुग्ध

ह्यांचा निंबवृक्षाला लेप द्यावा. तसेच त्याला दुग्धमिश्रित पाणी घालावे. म्हणजे त्याला गोड फळे येतील (२३०८). आंब्याच्या झाडाला अंकोलाच्या काढ्यात उकळलेले, मेंढीच्या दुधाने युक्त असे नृमांस पिण्याक नावाच्या वनस्पतीसह घालावे. मग ते झाड द्राक्षवेलीसारखे होऊन त्याला नेहमी फळे येतात (२३०५-६). आंब्याचा वृक्ष उंचीने लहान राहून त्याला सर्वकाल मोहोर व फळे यावीत ह्यासाठी एक पुरुष खोल खड्डा खणून त्याच्या सर्व बाजूंनी विटांनी बांधून घ्यावे. त्या खड्ड्यात निर्माण झालेला वृक्ष फार उंच राहत नाही व त्यास सर्वकाल फळे येतात.

## बिनबियांची फळे

झाडांना बिनबियांची ("अनस्थि") फळे यावीत ह्यासाठी अनेक प्रकारच्या युक्त्या शार्ङ्गधर पद्धतीत सांगितल्या आहेत. कवठ आणि बिल्व ह्यांस तूप, गूळ, दूध, मध ह्यांचा उपचार दिला असता त्यांना बिनबियांची, अतिशय मांसल आणि अमृतासारखी फळे नेहमी येतात (२२३७). ज्येष्ठमध, साखर, कुष्ठ, मधुक वृक्षाची फुले, ह्यांनी तयार केलेल्या मोदकांनी एखाद्या झाडाचे मूळ आच्छादून टाकले असता त्याला बिनबियांची फळे येतात (२२८३). झाडाचे खोड फोडून त्यात मधुकवृक्षाची फुले, गुञ्जा, शर्करा, उदुम्बर आणि मध ह्यांनी मिश्र असे तूप घालावे व ते बांधून ठेवावे. वरून गायीच्या वासराच्या शेणाचा लेप द्यावा. त्यामुळे बिनबियांची फळे येतात (२२८४). कूष्माण्ड, वार्ताक आणि पटोल ह्यांच्या बीजांना चरबीचा लेप देऊन ती स्वच्छ केलेल्या जमिनीत पेरावीत आणि त्यांना पाणी द्यावे. म्हणजे नेहमी बिनबियांची मोठी फळे येतात. (२२९८).

## फळाफुलांच्या वाढीवरून शेती वगैरे बद्दलचे "विज्ञान (कौल)"

झाडांची फळे, फुले, पाने इत्यादींची वाढ पाहून त्यावरून शेती वगैरे बद्दल "विज्ञान (कौल)" मिळतो. म्हणजे धान्याची समृद्धी होणार की नाही इत्यादीबद्दलचे यात्वात्मक सूचन होते. ह्यासंबंधी शार्ङ्गधर पद्धतीत (२११३ व पुढे) पुढीलप्रमाणे माहिती आली आहे. वडाची वाढ झाल्यास यव खूप पिकतात. टेंभुरणीच्या झाडाची वाढ झाल्यास षष्टिक (साठ दिवसात तयार होणारा) तांदूळ उत्तम पिकतो. अश्वत्थाची वाढ झाल्यास सर्व धान्यांची भरभराट होते (२११४). जांभळाची वाढ झाल्यास स्थलमाष चांगले होतात. शिरीषाची वाढ झाली असता मूग चांगले येतात. मधूकाची वाढ झाल्यास गहू चांगले पिकतात. सप्तपर्णीमुळे यव पिकतात (२३१५).

एरंडाची (हस्तिकर्ण) वाढ झाल्यास हत्तींची वाढ होते. अश्वकर्णाची (साग) वाढ झाल्यामुळे घोड्यांची वाढ होते. पाडळीच्या वाढीमुळे गायी-बैलांची वाढ होते. कदलीच्या वाढीमुळे शेळ्या-मेंढ्यांची वाढ होते (२३१६). आंब्याच्या वाढीमुळे कल्याण होते. बिब्ब्याच्या झाडाच्या वाढीमुळे भय निर्माण होते. पीलु (अक्रोड, ताड, कोबी) वृक्षाच्या वाढीमुळे आरोग्य निर्माण होते. खदिर आणि शमी त्यांची वाढ झाल्यास दुष्काळ पडतो. अर्जुन वृक्षाच्या वाढीने उत्तम पाऊस पडतो (२३१७). पिचुमंद, नागकुसुम, ह्यांच्या वाढीने अनावृष्टीची भीती निर्माण होते. कुटजवृक्षाच्या वाढीमुळे रोगाचे भय असते (२३१८). ह्यावरून विशिष्ट वृक्षांच्या वाढीचा एकूण जीवनावर अनुकूल-प्रतिकूल परिणाम काय होईल ह्यासंबंधीचे प्राचीन भारतातील लोकभ्रम स्पष्ट होतील.

विचित्रीकरण–

काही आश्चर्यकारक अशा प्रकारचे परिणाम घडवून आणण्यासाठी शार्ङ्गधरपद्धतीत पुढीलप्रमाणे युक्त्या सांगितल्या गेल्या आहेत. ज्या झाडांच्या फुलांना वास नसतो, अशा झाडांनाही सुगंधी फुले यावीत ह्यासाठी पुढीलप्रमाणे उपाय योजावेत. सुगंधी फुलांचा गंध दिलेली माती अशा झाडांना घालावी. धव आणि खदिर ह्यांचा काढा करून ते पाणी झाडांना घालावे. त्या झाडांना चंदनाचा लेप द्यावा. ह्यामुळे निर्गंध वृक्षांनाही सुगंधी फुले येतात (२२७७). कापसाच्या बाबतीत पुढीलप्रमाणे विचित्रीकरण करता येईल. यव, तीळ, आणि निशा नावाच्या वनस्पतीची पाने ही कापसाच्या झाडाच्या मुळाशी घालावीत आणि त्यांचे पाणी कापसाच्या झाडाला घालावे. ह्यामुळे पेटलेल्या अग्नीप्रमाणे दिसणारा कापूस येतो (२२७८). त्वक् (ही एक वनस्पती आहे), निशा, नीली, कुष्ठ ह्या वनस्पती आणि मद्य ह्यांचा लेपोपचार सावरीवर केल्यास तिला पोपटाच्या पंखाच्या रंगाचा कापूस येतो (२२७९). गाय, शेळी, मेंढी, ह्यांच्या दुधात मंजिष्ठा, तिल, यव, पीतसार (चंदन), जीवन्तीची पाने, मनःशिला हे पदार्थ उकळून त्या दुधाचा कापसाच्या झाडावर लेप दिल्यास आकाशी रंगाचा कापूस येतो (२२८०).

अकाली फुले–

पिकलेल्या उसाचा रस, व विदारिकंदक ह्याने एखाद्या फुलझाडाच्या मुळाशी लेप दिल्यास आणि उसाचा रस त्या झाडाला घातल्यास मोसम नसतानाही त्या झाडाला फुले येतात (शार्ङ्ग २२८१). तीळ, खलि, वावडिंग,

गोमय, ह्यांनी मिश्र केलेला, उसाचा रस एखाद्या झाडास घातल्यास त्याला मोसम नसतानाही फुले येतात व त्यामुळे लोकांचे चित्तहरण होते (२२८२).

विशिष्ट रंगाची फुले–

झाडांच्या फुलांचा रंग विशिष्ट प्रकारचा असावा असे वाटत असल्यास तसा तो घडवून आणता येतो. ज्या रंगाची फुले यावीत असे वाटत असेल त्या रंगाचे पाणी तयार करून त्यात झाडाचे बी भिजवावे मग त्या बीजाचे झाड वाढल्यावर त्याला येणारी फुले त्याच रंगाची होतात ( विष्णुधर्मो. २·३०·२१–२२ ) रातकमळाचा कंद पेरताना त्याला तूप व मध ह्यांचा लेप देऊन, ज्या रंगाची रातकमळे यावीत असे वाटत असेल त्या रंगाच्या दोऱ्यांनी तो बांधावा व पेरावा म्हणजे त्या रंगाची रातकमळे येतील. ( शार्ङ्ग. २२९६ ).

वात–पित्त–कफ आणि वृक्षरोग–

माणसांप्रमाणे वृक्षांनाही वात–पित्त–कफ असतात आणि त्यांचे रोगही ह्या दोषत्रयीवरच आधारलेले असतात. म्हणून दोष कोणत्या प्रकारचा आहे हे पाहूनच उपचार करावा आणि रोगाचा नाश करावा (नराणामिव वृक्षाणां वातपित्तकफाद् गदाः । संभवन्ति निरूप्यातः कुर्यात्तद् दोषनाशनम ॥ शार्ङ्ग २२५६). जो वृक्ष कृश, उंच, किडकिडीत, रूक्ष असतो, जो फल पुष्प धारण करीत नाही, तो वृक्ष वातप्रकृती समजावा. ज्याला ऊन सहन होत नाही, जो पांढुरका, शाखाहीन आहे, अकालीच ज्याची फळे पिकतात असा कृश वृक्ष हा पित्तप्रधान समजावा. ज्याच्या फांद्या आणि पाने स्निग्ध असतात, ज्याला फुले, फळे योग्य प्रकारे येतात आणि ज्याला वेलींनी वेढले आहे असा वृक्ष कफ प्रकृतीचा समजावा. तिखट, कडू व तुरट ह्या रसांनी वात प्रकुपित होतो. तिखट, उष्ण, खारट, व आंबट ह्यांमुळे पित्त प्रकुपित होते आणि गोड, आंबट, खारट ह्या रसांनी कफ प्रकुपित होतो ( शार्ङ्ग. २२५८–२२६१ ). ह्या पुढे वातादींचा उपशम करण्याचे उपाय सांगितले आहेत. सुस्निग्ध अशा मांसयुक्त पाण्याने वृक्षांचा वात नष्ट करण्यासाठी सुस्निग्ध, मधुर हिमजल वापरावे. तिखट, आंबट, तुरट, रूक्ष असे गरम पाणी घातल्याने कफही नष्ट होतो. रूक्षता, गाठी, वक्रता हे दोष वृक्षाच्या ठिकाणी वातामुळे निर्माण होतात. शेण, लोध्र, वसा, शेणयुक्त जल ह्यामुळे ते दूर करता येतात ( शार्ङ्ग २२६२–२२६३ ).

## वृक्षांचे आरोग्य

अंकोलाचा काढा, तूप, व मध ह्यांचे मिश्रण आणि डुक्कर व हरिणे ह्यांची वसा ह्या झाडांना घातल्यास त्यांची वाढ होते; फळे-फुले नेहमी येतात; शिवाय ते निरोगीही राहतात (शार्ङ्ग २२४८–२२४९) उन्निद्रता (फुले न मिटणे), माशासारखा वास येणे, पाने गळून पडणे, मुंग्या लागणे, ह्यासारखे दोष, साल गळून पडल्यामुळे किंवा पाण्याच्या अजीर्णामुळे निर्माण होतात. अशा वेळी झाडाच्या मुळाशी परशूने प्रहार करावेत व दोषयुक्त रस नष्ट करावा. मध, तूप, जन्तुनाशक नीळ ह्यांचा लेप द्यावा व मग त्यावर माती टाकावी. नंतर दूधयुक्त पाणी त्या वृक्षाला घालावे (२२७२-२२७४). झाडांच्या फांद्यांना शोष नावाचा रोग पाणी अजिबात न मिळाल्यामुळे किंवा फार मिळाल्यामुळे होतो. अशावेळी तूप, वावडिंग घातलेले दूध–पाणी घालावे (२२७१). साखर, तीळ, गायीचे दूध आणि पाणी झाडाला घातल्यास किंवा त्यांचा लेप किंवा धूप दिल्यास झाडाचा शोष हा रोग बरा होतो (२२७४). एखादा वृक्ष अग्नीत होरपळला गेला असेल तर त्याला शेणयुक्त पाणी आणि दूध मुळाशी घालावे आणि कमळाच्या कंदाने त्याचे सर्व शरीर लेपावे त्यामुळे त्याला पुनर्जीवन प्राप्त होऊन पाचूच्या रंगाप्रमाणे हिरवी पाने येतात (२२६७). एखाद्या वृक्षावर वीज पडून तो कोळपला असेल तर पुनः जीवन देण्यासाठी घन, वाळा, मधूक, ह्यांसह मूग, उडीद, यव आणि तीळ एकत्र करून दळावे व ते पीठ दूध आणि पाण्यासह झाडावर टाकावे. असे सिंचन वारंवार केल्यामुळे तो वृक्ष पोसला जाऊन पुनः पूर्ववत होतो (२२६८–२२६९).

झाडामध्ये काही दोष असल्याशिवाय त्याची पाने जर म्लान झाली आणि मुळाशी किडे पडले असले तर प्रयत्नपूर्वक ते दूर करावेत. गोमूत्र, आज्य, वावडिंग, मोहरी, तीळ, ह्यांचा लेप झाडाला द्यावा. मग किडे नष्ट झाल्यावर दूधपाणी झाडाला घालावे व धूप द्यावा. करंज, आरग्वध, अरिष्ट, सप्तपर्ण व त्वचा ह्या वनस्पतींच्या साहाय्याने तसेच मूत्र, दह्यातील पाणी आणि वावडिंग ह्यांच्या साहाय्याने किडे पडलेल्या वृक्षावर उपचार केल्यास किडे नष्ट होतात (२२६४–२२६२).

## टोळ, उंदीर, इत्यादींच्या विरुद्ध मंत्र

टोळ, उंदीर, पक्षी, मुंग्या, इत्यादींपासून झाडांना व पिकांना भय निर्माण झाल्यास पुढील मंत्र एकशे आठ वेळा जपून तो एका पानावर लिहावा आणि

अनुक्रमणिका

ते पान जमिनीत पुरावे. मग शेतातील किडे, पतंग, उंदीर, मुंग्या इत्यादी उपद्रवी प्राणी नष्ट होतात. हा मंत्र पुढीलप्रमाणे– ओं स्वस्ति किष्किन्धास्थित प्रकटपराक्रमान्तर्हितार्कमण्डलोपजीवितस्य श्री हनूमानाज्ञापयति– मूषक पतङ्गपिपीलिशलभकरभान् बककीटगान्धिकनिवहैर्न स्थातव्यम् । आज्ञामतिक्रममाणस्य शरीरनिग्रहः समावर्तयति । तस्य वानरसिंहस्य क्रममाणस्य सागरम् । कक्षान्तर्गतो वायुर्जीमूत इव नर्दति । हुं फट् हुं ( २१६२–२१६३ ). ह्या मंत्रात उंदीर, पतंग, मुंग्या इत्यादी प्राण्यांना मारुतीची आज्ञा आहे असे सांगून येथे राहू नका असे सांगण्यात आले आहे. राहिल्यास शरीरनिग्रहाची शिक्षा मिळेल अशी धमकी देण्यात आली आहे. शेवटी हुं फट् हुं ही अपनिवारक ( अपोट्रोपाइक ) अक्षरे घालण्यात आली आहेत. ह्या मंत्राचे यातुधर्मात्मक स्वरूप स्पष्ट आहे.

## अवलोकन

वरील वृक्षवैद्यकशास्त्रीय माहितीबाबत पुढील प्रकारचे अवलोकन करता येईल. प्राचीन भारतातील वृक्षविषयक लोकभ्रम, चालीरीती, समजुती, कर्मकांड इत्यादींचे दर्शन आपणास ह्या वृक्षवैद्यकशास्त्रात घडेल. वृक्ष हे केवळ उपयोगितावादाच्या दृष्टिकोनातून पाहिले जात नसत. ते लावणे, वाढवणे, त्यांचे रोग दूर करणे हे एक धार्मिक कर्तव्य मानले जाई. त्यापासून पुण्य व त्या पुण्यामुळे स्वर्गीय सुखाची प्राप्ती होण्याचे आश्वासन दिले गेले आहे. वृक्षांना यातुधर्मात्मक महत्त्व होते. त्यांचे उपयोग ऐहिक व पारलौकिक दोन्ही असत. वृक्ष हे केवळ सजीव मानले जात असत असे नाही तर ते शक्तिद्रव्यही मानले जात. त्यांच्या अस्तित्वाला वाढीला यात्वात्मक अर्थ असे. त्यावरून इतर जीवनातील घडामोडींवर परिणाम होतो असे मानले जाई. काही वेळा वृक्ष हे केवळ सजीव न मानता त्यांचे "मानवीकरण" केले गेले आहे. वृक्षांचे "दोहद" व त्यातील काही वृक्षांना कामिनीच्या मुखातील मद्य आणि कामिनीची लाथ ह्या स्वरूपातील दोहद ह्यांचा पुष्पफलादिवृद्धीशी जोडलेला संबंध ह्या दृष्टिकोणातून पाहण्याजोगा आहे. विशिष्ट वृक्ष लावावेत, विशिष्ट टाळावेत, अमूक वृक्ष अमूक दिशांना लावावेत ह्यासारखे वर्ज्यावर्ज्य नियम लोकभ्रमांवर आधारलेले आहेत. तसेच विशिष्ट वृक्षांची वाढ झाल्यास त्यामुळे वेगवेगळी पिके, हत्ती, घोडे अश्व इत्यादी पशू ह्यांच्या वाढीवर आणि एकूण सुभिक्ष दुर्भिक्ष ह्यावर होणारा परिणाम ह्या संबंधीचे विवेचन लोकभ्रमावरच आधारलेले आहे. "विचित्रीकरणातील"

बरेचसे प्रकार यात्वात्मक आणि केवळ कल्पनारम्यच असण्याची शक्यता आहे. ज्या रंगाची फुले हवी असतील त्या रंगाचे पाणी झाडाला घालावे हा आदेश साधर्म्याधिष्ठित जादूचा प्रकार वाटतो. झाडे लावण्याच्या वेळी अनेक धार्मिक विधी- ब्राह्मणभोजन, देवपूजा इत्यादी सांगितले आहेत. टोळ, पतंग ह्यांच्या नाशासाठी दिलेला मंत्र यातुधर्मात्मक आहे. एकूण वृक्षवैद्यक-शास्त्र "पुराणशैलीतील" आहे. त्याला "शास्त्र" हा शब्द मर्यादित अर्थानेच लावला पाहिजे. वृक्षावैद्यकशास्त्राचा अभ्यास प्राचीन भारतीय शास्त्रांच्या अभ्यासापेक्षा प्राचीन भारतीय यातुधर्माच्या अभ्यासालाच अधिक उपयोगी ठरेल असे मला वाटते.



डॉ. वसंत स. जोशी

# मुक्तेश्वरकृत ‘अहिमहि रावण वध’

एकनाथांच्या ‘भावार्थ रामायणा’तील अपुऱ्या भागांची परिपूर्ती करण्याचा प्रयत्न अनेक चाहत्यांनी केलेला दिसतो. युद्धकांडाच्या ४४ व्या अध्यायापासून ९२ व्या अखेरपर्यंतची रचना प्रचलित समजुतीप्रमाणे गावबाची आहे. त्यातीलही ५४ वा अध्याय हा जयरामसुत नावाच्या एका कवीचा आहे. ‘भावार्थरामायणा’चे उत्तरकांड रचण्याचा प्रयत्न वेगवेगळ्या चार व्यक्तींनी केला असून त्यापैकी मुक्तेश्वर आणि कोनेरीसुतशेष या दोन कवींची उत्तरकांडे मी प्रकाशात आणली आहेत. युद्धकांडातील ५४ व्या अध्यायाची परिपूर्ती करण्याचेही चार प्रयत्न यापूर्वी उजेडात आले आहेत. पैकी जयरामसुताचा अध्याय ‘भावार्थ रामायणा’च्या मुद्रित प्रतीत समाविष्ट होऊन तो सर्वत्र प्रसृत झाला आहे. याखेरीज धुळे व पुणे येथे या अध्यायलेखनाचा प्रयत्न करणाऱ्या दोन वेगवेगळ्या कवींचे अध्याय मला उपलब्ध झाले असून त्यांचा परामर्श मी माझ्या ‘भावार्थरामायणा’वरील प्रबंधात घेतला आहे.

आपले मातामह श्रीएकनाथ यांची ‘भावार्थरामायण’ ही कृती पूर्ण करण्याचा प्रयत्न त्यांचा प्रतिभाशाली नातू मुक्तेश्वर याने ‘उत्तरकांडा’ची रचना करून केल्याचे सिद्ध झाले आहे. त्याने ‘युद्धकांडा’तील ‘अहिरावण–महिरावण वधा’चे आख्यानही लिहिल्याचे मला उपलब्ध झालेल्या मुक्तेश्वराच्या हस्तलिखितावरून आढळून आले आहे. मुक्तेश्वराच्या नावावर असलेल्या काव्यात ‘अहिरावण महिरावण वध’ या नावाचे काव्य नाही. कै. दा. के. ओक यानी १९०६ मध्ये संपादित केलेल्या ‘मुक्तेश्वरकृत स्फुट काव्ये’ या ग्रंथात ‘शतमुखरावणवधाख्यान’ नावाचे १३३ ओव्यांचे काव्य प्रसिद्ध झाले आहे; परंतु त्यात प्रस्तुत आख्यानाचा अंतर्भाव नाही. त्यामुळे या मुक्तेश्वराच्या अप्रसिद्ध काव्याचा परिचय या लेखात करून देण्याचे योजिले आहे. त्यामुळे एक दुर्लक्षित मुक्तेश्वरकृत काव्य त्यांच्या चाहत्यांच्या नजरेसमोर येईल.

श्रीसमर्थभक्त कै. शंकरराव देव यानी धुळे येथील श्रीसमर्थ वाग्देवता मंदिरात संगृहीत केलेल्या हस्तलिखितांत हे काव्य उपलब्ध झाले. या हस्त-

लिखिताचा बाडांक ६१ असून त्याचेसंबंधी माहिती देताना कै. देव यानी म्हटले आहे. १०२×२×२=४०८ पृष्ठांचे हे बाड आहे. महारुद्रस्वामींच्या कारकीर्दीत म्हणजे १७३३ च्या पूर्वी ते कोणीतरी लिहिलेले असावे, असे आरंभी जे नमनाचे श्लोक दिलेले आहेत, त्यावरून वाटते. यात श्रीसमर्थांची थोडी कविता आहे, पण कल्याणांची पुष्कळ आहे. शिवाय (१) मुक्तेश्वरकृत विराटपर्व (१) जगज्जीवनकृत बालकांड (१) मुक्तेश्वरकृत अहिरावण महिरावण वध (१) श्रीधरकृत हनुमज्जन्मकथा ही प्रकरणे आहेत. शिवाय अन्यही काही पदपदांतरे त्या बाडात असल्याची माहिती त्यानी दिली आहे. वरीलपैकी मुक्तेश्वर-कृत 'अहिरावण महिरावण वध' या काव्याकडे माझे लक्ष वेधले. प्रत्यक्षात पाहाता ते दुर्लक्षित असून मराठी वाचकांना ते अपरिचित असल्याचे दिसून आले. सदर बाड पोस्ट कार्ड आकाराचे असून लेखन बरेच शुद्ध व स्पष्ट आहे. लिहिताना शब्दातील अक्षर गळणे, काना, मात्रा, अनुस्वार, इकार, उकार, लिहिले न जाणे हे प्रकार मधूनमधून आढळतात. अनुस्वार अत्यंत बारीक, पुसट स्वरूपात आहेत.

मुक्तेश्वराच्या या अप्रसिद्ध 'अहिरावण महिरावण वध' काव्याचे दोन प्रसंग आहेत. पहिला प्रसंग १४६ ओव्यांचा आणि दुसरा प्रसंग १५८ ओव्यांचा असे हे एकूण ३०४ ओव्यांचे काव्य आहे. 'आहीरावण महीरावण वध लीख्याते' असा प्रारंभ असून पहिल्या प्रसंगाचा शेवट

> इती श्री युद्धकांड कथा कुसरी । राम चोरीला ऐसीया परी
> मुक्त होतील ते ऐका श्रोत्रद्वारि । मुक्तेश्वर कवी वदे ॥ १४६ ॥

याप्रकारे आणि दुसऱ्या प्रसंगाचा शेवट

> इती श्री युध्यकांड रामायण । निमाले आहीमहि दोघेजण
> परीसोत विचक्षण । मुक्तेश्वर कवी वदे ॥ १५८ ॥

—या ओवीने करण्यात आला आहे. कवीने आपला नामोल्लेख स्पष्टपणे केला असून त्याच्या शैलीचे अन्य ग्रंथात आढळणारे विशेष याही काव्यात चांगल्या प्रकारे आढळून येतात. 'भावार्थरामायणातील चंद्रसेनाख्यान' या माझ्या लेखात ( म. सा. पत्रिका वर्ष ३१, अंक १२३. ) मी मूळ 'भावार्थरामायणा'च्या युध्यकांडातील 'अहि-महि-रावण वधा'चा एकच अध्याय गहाळ झाला व तेवढाच जयरामसुताने रचला असे दाखवून दिले असून संकेश्वर येथे मला उपलब्ध झालेला अध्याय हाच अधिकृत असल्याचे सिद्ध केले आहे. मुक्तेश्व-

राने मात्र या आख्यानाचे दोन प्रसंग लिहिले असून त्यात भावार्थ रामायणाचा किंवा 'एका जनार्दना शरण' या मुद्रिकेचा उल्लेख केलेला नसून स्वतःचा नामोल्लेख स्पष्टपणे केला आहे. यावरून हे काव्य त्याने स्वतंत्रपणे लिहिले असल्याचे दिसते. तथापि त्याची प्रेरणा त्याला ' भावार्थ रामायणा 'तील प्रस्तुत कथानकावरील अध्यायाच्या अभावातून झालेली असणे अगदी शक्य आहे.

## श्रोत्यांचा आक्षेप :

अहिमहिरावणवधाचे कथानक मुळात नसताना ते कोठून घेतले असा आक्षेप जयरामसुताचा अध्याय वाचून श्रोत्यांनी घेतला. त्यावेळी मूलाधार सांगताना जयरामसुताने म्हटले आहे –

परी प्रस्तुत अग्निपुराण । श्रोतीं पहावे शोधून
सेतुबंध माहात्म्यी जाण । हे आख्यान सविस्तर ॥३३१॥

– अग्निपुराणातील कथासूत्रावर त्याने तो अध्याय रचिला आहे. संकेश्वर येथे मला उपलब्ध झालेल्या अध्यायातील कथानक एकदम वेगळे आणि एकनाथांचा दृष्टिकोन यथार्थपणे मांडणारे असे आहे.

मुक्तेश्वरानेही जयरामसुताप्रमाणेच ' अग्निपुराणा'चा आधार घेतलेला आहे. या संदर्भात वक्ता व श्रोते या उभयतांचा झालेला संवाद असा आहे :

इतुकी जालीयां गत कथा । श्रोतीं आक्षेपीला वक्ता ।
वाल्मीकि काव्यामाजी नसतां । हें चरित्र कोठुनि काढिलें ॥१५५॥
वक्ता ह्मणे ऐका सुमनें । वाल्मीकित नाहि हें न म्हणें ।
परी प्रस्तुत अग्नीपुराणें । वाखाणीजे हे कथा ॥ १५६ ॥
तें न पाहत येकयेकासी । दुशण काढी ते होतिल दोसी
येणें वाक्यें जाले संतोशी । संत श्रोतेजन ॥ १५७ ॥

मूळ ' वाल्मीकि रामायणा'त नसले तरी ते आख्यान ' अग्निपुराणा'-तील असल्याचे सांगून मुक्तेश्वराने श्रोत्यांच्या शंकेचे निरसन केले आहे.

## महीरावण कथेची विचित्र रूपे :

लोकमानसात प्रचलित असलेल्या अहि–महीरावण कथेची रूपे स्थल–कालानुरूप भिन्न भिन्न आढळतात. या कथेत हनुमंताच्या पराक्रमाची वर्णने प्राधान्याने आहेत. तीत हनुमंत-पुत्र मकरध्वजाच्या उपकथेने रंगत आणली आहे. बंगालकडील काली भक्तांनी हनुमंताने कालीमातेच्या साहाय्याने राम-लक्ष्मणांची

अनुक्रमणिका

सुटका केल्याचे सांगितले आहे. अशा कथोपकथांनी हे उपाख्यान अधिकच आकर्षक व लोकप्रिय झाले आहे. रावणाचा मित्र महीरावण राम–लक्ष्मणांना पाताळात घेऊन जातो, तेव्हा आपला पुत्र मत्स्यराजाच्या साहाय्याने हनुमंत त्यांची सुटका करतो असे वर्णन 'जैमिनी भारता'त येते. 'कृत्तिवास रामायणा'त महीरावण हा रावणाचा पुत्र मानण्यात आला आहे. परंतु त्यात हनुमंतपुत्राचा मात्र उल्लेख नाही. 'आनंद रामायणा'तील कथेप्रमाणे अहिरावण-महिरावण म्हणजे शापित अश्विनी-कुमार होत. या आख्यानात येणाऱ्या हनुमंत–पुत्र मकरध्वजाच्या उत्पत्तीसंबंधीही विविध कथा सांगण्यात येतात. 'जैमिनी भारत,' 'गुजराती नर्म कथाकोश' इ. ग्रंथानुसार लंकादहनानंतर हनुमंत समुद्र-स्नानासाठी गेला असता एका मकरीने त्याचा स्वेद ग्रहण केल्यामुळे ती गर्भवती झाली. 'आनंद रामायणा'त हनुमंताचा श्लेष्मा एका मकरीने खाल्ल्याने तिला मकरध्वज नावाचा पुत्र झाल्याचे सांगितले आहे. इतर काही 'रामकथा'त लंकेहून परत येताना हनुमंताचा मकरीशी समागम झाल्याची हकीगत सांगण्यात आली आहे. 'कृत्तिवास रामायणा'वर शाक्त संप्रदायाचा बराच प्रभाव आहे. त्यामध्ये लंका–प्रवेशाचे वेळी चामुंडा हनुमंतास अडविते, अहि-महिरावणांच्या तावडी तून हनुमंत कालीच्या साहाय्याने राम-लक्ष्मणांची सुटका करतो इ. वर्णने आली आहेत. मुक्तेश्वराने मात्र कालीस गौणत्व दिले असून हनुमंताच्या पराक्रमास प्राधान्य दिले आहे. अहिरावणाची पत्नी चंद्रसेना हिची रामाशी सुरत-सुख अनुभविण्याची इच्छा हनुमंताने मान्य करणे, रामाने तिच्याकडे जाऊन मंचक भंगल्यामुळे निघून येणे इ. गोष्टींचे वर्णन मुक्तेश्वराने केले आहे. त्यामुळे हनुमंत व श्रीराम यांच्या व्यक्तित्वास गौणत्व प्राप्त झाले आहे. संकेश्वरप्रतीतील अध्यायात चंद्रसेना ही श्रीरामाची एकनिष्ठ भक्त दाखविली असून रामदर्शनाने ती समाधिसुख अनुभवते असे दाखविले आहे. त्यामुळे श्रीरामाच्या एकपत्नीव्रताचा कल्पनेतही भंग झालेला नसून चंद्रसेना व श्रीराम यांचे भक्त-परमेश्वराच्या उदात्त पातळीवरून रेखाटन झाले आहे. मुक्तेश्वर उदात्तीकरणापेक्षा कथानकातील रहस्य व त्यातील रंजकता यांचेकडेच अधिक लक्ष देताना दिसतो.

## कथासूत्र

रावणाच्या इच्छेनुसार अहि–महिरावण महिकावतीहून लंकापुरास आले. त्यानी राम–लक्ष्मणांना चोरून नेण्याचे ठरविले. ही वार्ता बिभीषणाने हनुमंतास व त्याच्या परिवारास कळविली. त्यानी राम–लक्ष्मणांभोवती शेपटांचा दुर्गपरीघ

उभारला. तेव्हा आकाशात उडून ते राक्षस आत उतरले व दोघांनाही मस्तकावर घेऊन महिकावतीस गेले. त्याना नागपाशाने बांधून आपण रक्षणास राहिले.

इकडे कपि–सैन्य जागे होऊन पाहते तो मुख्य धुरा दिसेनाशा झाल्या. शय्यास्थानी कृतांतमुखासारखे विशाल कुहर पडले होते. राक्षसाचे एकवीसावे पाऊल उमटले होते. विश्वाचा प्राण नेला म्हणून त्यानी शोक करण्यास प्रारंभ केला. बिभीषणाने त्याना सावध केले. 'स्वामींना शोधून काढा. हनुमंतामुळेच हरपलेला रघुनाथ सापडेल' असे त्याने सांगितल्यावरून सर्वांनी हनुमंतास प्रार्थना केली. हनुमंताचा भीमप्रताप खवळलेल्या सर्पाप्रमाणे चेवविला. त्याने बिभीषणास कपिसमूहाचे रक्षण करण्यास सांगितले आणि नळ, नीळ, आंगद, जांबुवंत यांच्यासमवेत त्याने विवरात प्रवेश केला. पुढे त्यांनी दधिसमुद्र पाहिला. तेथे सातकोटी निशाचरांसह रक्षणासाठी वक्र मगर राहिला होता. तेव्हा भिक्षुक-याचक वेशाने ते त्यांचेजवळ गेले. राक्षसांनी त्यांना दंडसंकेताने हाकलले. 'म्हणती आमार्गे ग्रामीये धीटे। मरावया आलेती कोठे। सिघ्र परता म्हणोनि नेटे। लोटुनि मागे सारीले' (१.४५) त्यांचेशी हनुमंताचे युद्ध झाले. त्यावेळी त्यातील मकराने आपण अंजनीतनय हनुमंताचा पुत्र असल्याचे सांगितले. तेव्हा हनुमंताने आपण आजन्म ब्रह्मचारी असताना तू सुत कसा झालास असे विचारले. 'लंकादहनानंतर पुच्छ विझवताना हनुमंताने टाकलेले अमोघ वीर्य मगरीने गिळले व मी तिच्या उदरी जन्मलो' असे म्हणून त्याने आपले मस्तक हनुमंताच्या पायावर ठेवले. घरी जाऊन त्याने मगरीस बोलावून आणले. तिने त्याच्या येण्याचा हेतू ओळखला. "उद्या माध्यान्ही शक्तिदर्शनास रामचंद्रास वधण्याकरिता आणतील. तेथे भद्रकालीच्या मंदिरात बसून आपला कार्यभाग साधावा" असे तिने सांगितले. हनुमंताने तिचा गौरव करून दैत्यवधानंतर तुझा मुलगा महिकावतीवर असेल असे सांगितले. इतर चौघे मकरीसमवेत दधिसमुद्र ओलांडून महिकावतीत आले, तर हनुमंताने समुद्रावरून उड्डाण करून प्रवेश केला. महिकावतीचे स्वरूप पाहून कामाक्षीच्या मंदिरात प्रवेश करून त्याने दारे लावून घेतली. त्याचे उग्ररूप पाहून शक्तीस प्राणसंकट वाटले.

दुसरीकडे राक्षसांनी नगरात गुढचामखरे उभारिली. देवतार्चनाची सिद्धता केली. देवीचे मंदिर बंद असल्याचे पाहून त्यानी प्रार्थना केली. तेव्हा देवीने गवाक्षद्वारातून नैवेद्य समर्पिण्यास सांगितले. 'ऐसशक्तीचे शब्द प्रांजळ। ऐकोनि उदो बोलती सकळ। चौंडके वाउन गोंधळ। घालीताती संतोशे'







( १.१०८. ). गवाक्षद्वारातून पडे ते सर्व कपि–मुखात नाहीसे होई. तेव्हा पुजाऱ्यांनी पहारा, काष्टिकादडांनी नाहाण्या ( मोऱ्या ) मोकळ्या केल्या. तेथे शक्ती भीतीने दडाली होती. तिच्या अंगावर प्रहार पडू लागले. ती म्हणाली, ' मला दोहोंकडून संकट पडले आहे. अहिरावणाने रामाचे हरण केले आणि येथे हनुमंताने मला दाटले. कपी नैवेद्य भक्षण करितो, तर गुरव माझ्या शरीरास पीडा करतात.' तेव्हा मुक्तेश्वर म्हणतो, ' आधम दुष्टांची संगती। ऐसीच वेसने प्राप्त होती। नवसी त्या पशुवे मागीजेती। त्याचे उसीणे हे वाटे। (१.१२३) देवीनेच सर्व नैवेद्य खाल्ल्याचे पाहून गुरव निराश झाले. काहींना आपल्या परम भक्तीने पाषाणप्रतिमा नैवेद्य भक्षितात याचे कौतुक वाटले. वृद्धांना नवल वाटले. काही अघटित घडणार या कल्पनेने ते आपापल्या घरी परतले. नैवेद्यानंतर देवीने फळभक्षणाची इच्छा व्यक्त केली. शेवटी दीर्घस्वराने आपण संतुष्ट झाल्याचे तिने सांगितले व ' लंकावासीयांप्रमाणे तुम्ही सुखसंपत्ती भोगाल ' असा आशीर्वाद दिला. राम-लक्ष्मणास बळी देण्याकरिता राक्षसांनी देवीचा उदोकार करीत आणले.

या पहिल्या प्रसंगात मुक्तेश्वरी चिरपरिचित शैलीचा प्रत्यय देणारी काही उदाहरणे अशी आहेत. राक्षसांनी देवीला अर्पण केलेल्या सुवर्णपात्रातील अन्नाचे वर्णन —

वोदन पंचरंगाचे कुसरी। नाना वळवंटाच्या क्षीरी। श्रवत घृतसाकरी। पाकपात्रे वोतीती ११३. मध्वी वडे मधुवडे। कीरवडे आंबवडे। रायवडे चिंबवडे। चंद्रातुल्य आरुवार ११४. घाऱ्या घारीगे क्षीरधारीया। साकर मांडे सांजवटीया। पुऱ्या गुळवरीया बळकुसरिया। खाज्या करंज्या घृतपुरे ११५. लाडु तीळवे कानवले। फेण्या दंडुरिया हे सकळे। अधीक मासीचे महिमा-गळे। कडकणे माळा सलेवा ११६. धीरडी ढोकळे वेढणीयां। मुदा दध्योदना-चिया। आफुट बहुधान्य घुगरीया। संखेरहीत रीचवीती ११७. रिचवीती कथीकांचे डेरे। धारिती घृतरसाचे धारे। मधुदधी दुग्ध येकसरे। प्रवाह वाट सोडीती ११८. समुद्री नाना सरितांचे वोघ। मीनले त्यांचा न दीसे मार्ग। तेवी वोपीता त्यांचि सीग। नये काठीवरी शोधीता ११९

देवीने फळाची इच्छा व्यक्त करिताच राक्षसांनी ती अर्पण केली. ' लोणची रायती सांबारी। शाखा फळावळीकंद कुसरी। परवडुनि मीठ मोहरी। बहुता करीं समर्पीले १३३. मधुरा आंबुसी सीखरणी। येळा कर्पुर सुगंध मळणी। ढेकर देतसे सेउनि। मीटक्या देतु मटमटा १३४. केळे अंबे नारी-

केळे । द्राक्ष बद्रिफळें फणस रसाळें। अंजीरी खर्जुरि जांभळें। रायआवळे नारींगे १३५. माहुळींगे मातुळींगे। गभीरे कमरखे आनासे सुभंगे। युक्षदंड कांडोरी आव्यंगे। आणी आनंगे आप्रसीधे १३६. भागले राक्षस वोपीतां। परी पुरे न ह्मणे देवी खाता। ह्मणे आशोक वना उपरी आतां। त्रुप्त जाली दुसरेनी १३७. मग घट वोतीले शुध जळें। तेणें मुखां क्षाळण केलें। सबेंची पुगी नागवेली दळें। तांबोलार्थ वोपीलि १३८.

## महि-अहिरावण वध

दुसऱ्या प्रसंगात प्रत्यक्ष युद्धाचा प्रसंग मुक्तेश्वराने वर्णिला आहे. राम-सौमित्र सावध होऊन, आपण दुर्गम ठायी आल्याचे पाहून विस्मय करू लागले. राक्षससैन्याने त्यांना देवीस अर्पण केले. पुढें कपाटें देउनि द्वारीं। गोंधळ घालीती उदोकारी। दीवट्या दर्शनें घेउनी करी। रंगणी नाचती अहीमही ( २.१४ ). रामाने देवीची प्रार्थना केली. मायावी रूप सोडून हनुमंत सद्गदित होऊन प्रगटला. त्याने महीरावणास आव्हान दिले. तो युद्धासाठी आला. ' ऐसे ऐकोनि येकायेकी। येरू प्रवेशला देउळामुखी। जैसा पतंग पै पावकीं। बळें पडे प्राणांतीं ३१. घोर दाटला अंधकार। माजी भींगुळवाणे नेत्र। धगधगीत माहांक्रूर। आली भयासूर ते प्रतीमा ३२. महदभूत देखोनि डोळा। कंप सुटला चळचळां। दृष्टी झांकुनी चरणकमळा। मस्तक ठेवी भयाभीतु ३३. धाकें मौळ ठेवीतां चरणीं। देवीने पायें दडपीला मुर्ध्नी। कंठ आवरोधला घ्राणीं। स्वासोस्वास कोंडला ३४. तडफडुनि नेत्रावाटीं। प्राण दिधला दुःख संकटीं। हस्तपाद झाडीतां श्रृष्टी। थरारलीं सप्त द्विपें ३५. मुखीं नासीकीं वमीत रक्ता। महि पावला मरणावस्ता। तो दणदणाट हो समस्तां। बाहिरलीयांसी श्रुत जाला ३६.

देवीदर्शनार्थ गेलेल्या महीरावणाला चौकशी करण्यासाठी अहिरावण भोप्यास आत जाण्यास सांगतो. त्यावेळी त्याची झालेली स्थिती– 'काय वृत्तांत तो पाहा डोळां। तंव भोपा उठीला उतावेळा। जैसें व्याळाचिया बीळा। मुशक रीघें चारीया ३९. देवाचा वरदप्रसाद वेगे। हा येकलाचि नेईल आंगें। ह्मणोनि तयाचा दायाद मागें। दुसरा राखतु चालीला ४०.'

देवीचे विक्राळ रूप पाहून गुरव दचकला. त्याला हनुमंताने पायातळी रगडला. मागून येणाऱ्या दायादाने मारुतीचे रुद्ररूप पाहिले. ' बोंथरे वळली त्याची बोबडी। पाया पडीली बेंगडी। मागें तवाने मुरकुंडी देउळाद्वारिं

अनुक्रमणिका

कोसळली ४५. दोहिं हातें संख करीतु । ह्मणे पळा रे मांडला अंतु। लंका जाळीली तो काळ मुर्तीमंतु । देउळामाजी बैसलासे ४४.

महीरावण व देवळाच्या भोप्याची हनुमंताने केलेली स्थिती ऐकताच सर्वत्र घबराट उडाला. ' बोंब वाजीनली येकसरी । पळतया थोडी धरत्री। येक वार्ताच यैकतां शरीरिं । प्रेतदशा पावले ४६. धाकें वळघतां अंबरीं । चांचरी पडताती समुद्रीं । ते ग्रासीजेति जळचरीं । येक दिगांती दडाले ४७. परंतु अहिरावण मात्र सैन्यासमवेत कवच, टोप, धनुष्य-बाण घेऊन सरसावला. ' म्हणे आजि रेणुकेचां रंगणीं । शत्रुचि रुंडें घुमविन बाणीं । नक्षेत्र दिवे वीझवित गगनीं । सिसकुरळी त्यांचिया ४९.

## हनुमंत पराक्रम

उभयस्कंधी राम-सौमित्रांना घेऊन भुभुःकार करीत हनुमंत प्रगटला व युद्धास प्रारंभ झाला. अहिरावणाने रघुनाथाच्या कपाळावर मारलेले बाण म्हणजे जणू गंधाक्षताच होत्या. अहिरावणाच्या रक्तबिंदूपासून लक्षावधी अहिरावण निर्माण होऊ लागले. त्याचे रहस्य मकरेकडून हनुमंत जाणून घेतो व अहिरावणाची पत्नी चंद्रसेना हीस भेटण्यास जातो. ती आसनावर ध्यानस्थ बसलेली होती. देखोनि श्रीरामाचे रूप । वेधें वाढले विरहताप । रघुनाथ ध्यानमूर्ती चिद्रुप । हृदयालइ लक्षीती ' ७६. तिला नमन करून हनुमंत सर्व हकीगत सांगतो. राघवाशी सुरतसुख मिळावे अशी इच्छा ती व्यक्त करते. तसे वचन मागून ती रक्तबिंदूतून निर्माण होण्याऱ्या राक्षसांचे रहस्य सांगते. त्यानुसार पाताळातून अमृत घेऊन येणाऱ्या भ्रमरांना हनुमंत मारून टाकतो. त्यातील शरण आलेल्या एका भ्रमरश्रेष्ठास तो सोडून देतो. अमृताची वृष्टी संपल्याने शत्रुपक्ष रोडावला. रामलक्ष्मणांनी राक्षस-संहार आरंभिला –
' कोट्यान कोटी भस्म जाले । आसंख्य कोळसे होउनी गेले। कीतेक हुरपळोनि पडीले। वृंताक फळासारीखे १०९. सैन्याभोवती पुच्छ वेढून । हाती लोहार्गळा घेऊन हनुमंताने वीर कांडण मांडले. हनुमंताच्या युद्धाचे वीररसपूर्ण वर्णन मुक्तेश्वराने केले आहे, 'कुंजर ताडीत कुंजरें। रहिवरू पाडीत रहिंवरे। वारुवरी वारू वीरें। चुरा करीत हाणोनी ११३. घायातळीं लक्ष कोटी । गतप्राण होउन पडीले भूतळवटीं । बहुतीं जणीं देउनि पाठी। पळों लागले दशदीशा ११४. दुरीं पातलों बहुत गांवें । आजी वांचलों थोरादैवें । तवं पुढारी देखती आडवें । शेशातुल्य कपी पुच्छ ११५. येक उडोनिया आंबरीं । म्हणती बुधी फावली बरी। तवं पुछजाल नक्षेत्रासरी। कवळीतचि पातलें ११६. येक सागरीं पातले । तवं कपीपुच्छ

कवळीतची आलें । येक पाठीं दडाले । पुछ पातलें तेथेंही ११७. आवघे कवळुनी येकवाट । आर्गळा घातेंकरि पीठ । मस्तकें फोडीती थडथडाट । नारीकेळासारीखें ११८.

हनुमंताच्या पुच्छाने केलेल्या हाहाकाराचे वर्णन करताना मुक्तेश्वर समकालीन समाजघटकांवर जी टीका करतो ती जितकी विनोदी तितकीच भेदक वाटते, ‘ तेली घाणां देउनि बुडी । आपणावरी रचीती पेंडी । चाटे भाटे दडाले दींडी । कापडाच्या भयाभीत १२०. तव पुछें भेटा उचलीत्या पाहीं । लपाल्या वोढीत धरूनी पाइ । सर्वेचि रिघाला कापडगृहीं । शंख करीती चित्कार १२१. धान्याकोठारिं रीघाले वाणी । द्रव्य वाटवांसरा फसोनि । तवं पुछें शेंडिये धरुनी । वोढुनि बाहेरी काढिजेती १२२. येंकी लपोनियां तळघरीं । वज्र कपाटें लावीली द्वारीं । तवं पुछें शोधुनि नेले वीवरीं । नुतन पाडुनि आणीके १२३. देह आशक्ती चेनि वेगें । येक लपाले स्त्रीयांमागे । येक वासना संकोच आंगे । पादसंधी रिघताती १२४. येक वीशयेंभोगे चाडा । सुक्षम देहि मृत्य भेडा । कामीनि नितंबिया आंगडा । ह्मणती मरणा चुकलों १२५. येक ह्मणती सलंब कुच । हेचि आह्मां वज्रकवच । ह्मणोनि पांघरोनि आहाच । तयातळीं लपाले १२६. तंवकाळ फास घालुनि गळां । पुछे वोढिलें येक वेळा । आपत्ये करीताती कोल्हाळा । बाबा बाबा ह्मणोनीयां १२७. पुसे अवळीतां गळे । राक्षेस पसरीती दांत डोळे । हनुमंत ह्मणे, ‘राघवा बळें । वैरी आह्मांतें हांसती १२८.’

## चंद्रसेनेस वरदान

उरलेले राक्षस चंद्रसेनेस शरण गेले. राम–लक्ष्मण हनुमंत एकत्र आले. तेव्हा देवांनीं पुष्पवृष्टी केली. सैन्य नाशाची माहिती रामाने हनुमंतास विचारली, तेव्हा तो उद्विग्न झालेला दिसला. त्याने रामास सांगितले, ‘ चंद्रसेनेस तुझे अंतुरीपण देण्याचे भाश-प्रमाण मी दिले व जय आंदण घेतला.’ माझे एकपत्नी व्रत असता हे वचन तू कसे दिलेस ‘ असे म्हणून राम हसतो व हेही निभावून नेऊ असे सांगतो. ‘ अभंग.सेज तयार करावी, भंगल्यास रघुवीर सेवन करणार नाही ’ असा निरोप हनुमंत चंद्रसेनेस देतो व त्याने रक्षिलेल्या भुंग्याचे स्मरण करतो. त्याने सर्व मंचक पोखरून ठेवला. श्रीराम मंचकावर बसताच तो कोसळल्याने तेथून राम–हनुमंत त्वरित निघाले तेव्हा चंद्रसेना हनुमंतास शाप देण्यास उद्युक्त झाली. त्यावेळी तिच्या मस्तकावर हात ठेवून श्रीराम म्हणाले , ‘ तुझ्या हृदयी प्रगटलेले माझे स्वरूप भोगत राहा. पुढे कृष्णावतारात तू सत्यभामा होशील. ’ हे ऐकून ती समाधिसुखी पहुडली. मकरध्वजास

अनुक्रमणिका

राज्यावर बसवून ते सर्व वानर सैन्यात परत आले. सर्वांच्या भेटी झाल्या. कपिसैन्यरूपी निर्जीव शरीरात जणू प्राणच परत आला होता. वानरांनी केलेल्या जयजयकाराने अंबर नादावले.

## काव्याचे वेगळेपण

एकनाथांच्या 'भावार्थ रामायणा'तील अपुऱ्या भागाची पूर्ती करण्याच्या प्रेरणेतून मुक्तेश्वराने हे काव्य लिहावयास घेतले असावे, परंतु त्याला दोन प्रसंगांच्या स्वतंत्र कथाकाव्याचे स्वरूप प्राप्त झाले आहे. दोन्ही प्रसंगात 'एका जनार्दना शरण' अशी नाममुद्रा किंवा 'भावार्थ रामायणा'चा उल्लेख नाही. त्याच्या 'उत्तरकांडा'त मात्र त्याने स्वतःला पडद्याआड ठेवून एकनाथांच्याच नावाने रचना केली आहे. प्रस्तुत काव्यात स्वतःचाच नामोल्लेख त्याने केला आहे. रामायण, महाभारत, भागवतादि ग्रंथांतील अनेक कथोपकथांवर प्राचीन मराठी कवींनी आख्यान काव्यरचना केली आहे. लोकमानसात रूढ असलेल्या कथांना स्वाभाविकच त्यात प्राधान्य मिळाले आहे. अहि-महिरावण वधकथा मूळ 'वाल्मीकि रामायणा'त येत नाही. तो नंतरच्या कवींचा कल्पनाविलास आहे. तथापि हे कथानक मात्र त्यातील अद्‌भुत व वीररसयुक्त प्रसंगानी चित्तवेधक ठरले. प्रारंभी सांगितल्याप्रमाणे विविध रामकथात्मक ग्रंथांतून त्याची विविध रूपे साकार झालेली दिसतात. राम-लक्ष्मणांना पाताळात पळवून नेले जाणे, त्यांना कालीदेवीस बळी देण्याचा प्रसंग, अहिरावणाच्या रक्तबिंदूतून लक्षावधी राक्षसांची निर्मिती, अमृतबिंदू आणून राक्षस निर्माण करणारे भ्रमर, हनुमंताने त्यांचा केलेला संहार, त्यासाठी अहिरावणपत्नी चंद्रसेना हीस द्यावे लागलेले वचन, त्यातून झालेली रामाची सुटका अशा अनेक रहस्यमय घटनांनी हे आख्यान खचून भरले आहे. त्यातच आणखी एका कुतुहलजनक प्रसंगाची भर पडली आहे. लोकमानसात साकारलेला ब्रह्मचारी हनुमंत येथे एक वत्सल पिता व पती या स्वरूपात वावरताना दिसतो. त्याचे कौटुंबिक जीवन हासुद्धा लोकेच्छेच्या दुसऱ्या अंगाचेच प्रकट रूप म्हणता येईल. मूळचे कथानक असे आकर्षक व रहस्यमय असले तरी मुक्तेश्वराने आपल्या वेधक व रोचक शैलीने ते अधिक रमणीय बनविले आहे. मुक्तेश्वरी शैलीची कल्पना वर दिलेल्या उताऱ्यांवरून येईलच. मुष्टी वोपणे, खंडविखंड करणे यासारखे त्याचे आवडीचे शब्दप्रयोग आणि अनेक पेयांची, खाद्य पदार्थांची, फळांची त्याच्या अन्य काव्यांत आढळणारी वर्णनेही येथे आली आहेत.

राक्षसानी काढलेली राम–लक्ष्मणांची मिरवणूक, हनुमंताचा पराक्रम इ. वर्णनांनी हे आख्यान अधिकच बहारदार झाले आहे. शत्रूंची मस्तके उडवून आकाशातील नक्षत्रदिवे विझविणे ( २–४९ ) हनुमंत स्कंधावरील राम सौमित्रांना पाहून रवि-शशि-देवगुरु एके ठायी उगवले असे वाटणे ( २.५१ ), आकाश मेघांनी भरून जावे त्याप्रमाणे भ्रमरकुळे दाटणे ( २.९८ ) ‘देवीपुढे काय घडले हे पाहण्याकरिता भोपा उठला. ‘जैसे व्याळाचीया वीळा । सुशक रीघे चारीया’ ( २.३९ ) अशा कित्येक नवनव्या कल्पनांनी काव्यात रंगत आली आहे.

एकनाथ-मुक्तेश्वर हे समाजजीवनाचा वेध घेणारे कवी होते. त्यामुळे रामायण-महाभारतातील कथा नव्याने सांगत असताना समकालीन परिस्थितीचे त्यांचे भान सुटले नाही. किंबहुना त्या कथामाध्यमातून समकालीन राजकीय व सामाजिक परिस्थिती त्यांनी उभी केली. स्वराज्य आणि स्वधर्म रक्षणाची आवश्यकता जशी त्यानी सांगितली, त्याचप्रमाणे शुष्क वादविवादात रमण्याच्या प्रवृत्ती, अंधश्रद्धा, वामाचार इ. सामाजिक दोषांवर त्यानी टीकाही केली आहे. अर्थात हे करीत असताना स्वाभाविकपणेच कालविपर्यासही होतो. प्रस्तुत कथाकाव्यात ‘मारुतीने आपले प्रचंड रूप, ज्याप्रमाणे अनंताने अर्जुनास दाखविले त्याप्रमाणे, मकरेस दाखविले (१.६२) या ठिकाणी किंवा ‘ धर्मधरा गवा साधु। पाळुन करावा दुष्टांचा वधु। हेची अवतार कारणे भेदु । वीचचक्ष बोलती’ ( २-८१ ) अशासारख्या ठिकाणी कृष्णावतारातील गीतेचे स्मरण होऊन कालविपर्यास होतो, परंतु साहित्यातून होणारे समाजदर्शन हेही तितकेच महत्त्वाचे असते. पाताळातील कालीचे वर्णन करताना मुक्तेश्वरासमोर देवी जगदंबा, तिच्यासमोर घातला जाणारा गोंधळ, देवीचे पुजारी असणारे भोपे, त्यांचा स्वार्थी स्वभाव ही सर्व उभी राहातात. आणि हाती दिवट्या घेऊन, उदो उदो म्हणत गोंधळ घालीत रिंगणात नाचणारे अहि-महीरावण साकार होतात. ( २.१४ ) देवीपुढें वधिले जाणारे पशू आधी पोसले जातात याचेही मुक्तेश्वरास चांगले स्मरण आहे. अहिरावण राम-लक्ष्मणांना उद्देशून म्हणतो.

तव अहीरावण बोले वचनें। रामा तुं कौशल्येचें तान्हें। पीडा परीहरू दशाननें। बळी धाडलासी जगदंबे ५३. तुम्ही तिघीजणीं बस्ती । त्रिकुटीच्या राक्षेस वनस्पती । खाउनि पोसलेति परी अंतीं। नवसा आलेती आमुतें ५४.

आतां सीरें छेदुनी शस्त्रें। तोरणे बांधेन देवद्वारीं। दिग्बळी सांडीन चहुंमेरीं। आवयेव खंडें करूनियां ५५.

आपल्या काव्यांत-उपमा रूपकादि अलंकारांची निर्मिती करताना मुक्तेश्वर बऱ्याच वेळा परमार्थ विचारातील कल्पनांचा आश्रय करतो. त्याचप्रमाणे परमेश्वरप्राप्तीसाठी केवळ शाब्दिक वाद निरर्थक असून भक्तिभावाची आवश्यकता असल्याचे प्रतिपादितो. उपास्य दैवतांचा आग्रही अभिमान मोक्षकारक नसल्याचे सांगून अद्वैतमताचा पुरस्कार तो करतो. हनुमंताचे स्मरण करताना श्रीराम म्हणतो, 'शंकर आमच्या हृदयात। तोची मुर्तीवंत हनुमंत' (२.८)

## महिकावतीचे वर्णन

समकालीन क्षूद्र देवता व त्यांचे उपासक, शाक्त, कापालिक यांचेवरही मुक्तेश्वर टीका करतो. महिकावती म्हणजे राक्षसनगरी. स्वाभाविकच तेथे या सर्व दुराचाऱ्यांची वसती असणार या कल्पनेने मुक्तेश्वराने महिकावतीचे वर्णन केले आहे.

'गगनातुल्य च्यारि द्वारें। आर्धमोकळी भयंकरें। द्वारीं बैसले आभीच्यारें। जपी होमी राक्षस ८०. मौनास्त्र ब्रह्मास्त्र मंत्रमाळा। बगळा मुखी लघुशायळा। काळ रात्री निर्वाण बाळा। कर्णपीशाच न वर्णवे ८१. नग्न पीशाच भग माळीणी। सुकी सैळी परपक्षणी। उचीष्ट चांडाळी शांकीणी। सायराणी काळीका ८२. सप्त कोटी माहामंत्रें। चतुशष्टी वीधीन यंत्रें। उपासनादी आगम मंत्रें। उपासीती मात्रुका ८३. वाम दक्षण उभय मार्ग। घटमठादि पुजा सांग। वीर माहेश्वर निर्वेग। कौळिका चारे वर्तती। ८४. शक्तीशेश करीती पानें। गणेशशेश कवळासनें। पंचमुद्राचि लक्षणे। तीर्थ शुद्धी संयुक्त ८५. बहिरव चक्रीं जो पातला। तो ह्मणती ब्राह्मण भला। चक्राबाहेरी तो बोलीला। भीन्न वर्णी पशुप्रायें ८६. जेंवी द्रवीं आधोगती। तेंहिच होय मोक्ष प्राप्ती। ऐसे बोलती प्रमाण ग्रंथीं। इश्वर वाक्य ह्मणोनी ८७.' हे त्यांचे सर्व बोलणे ऐकल्यानंतर कपाळावर हात मारून हनुमंत म्हणाला, 'आता याना मोक्ष प्राप्ती कशी होणार? मोक्ष-सायुज्य बाजूस राहू द्या, परंतु माझ्या हाताने याना त्वरित कपाळमोक्षाचे रोकडे फळ मिळणार असे दिसते आहे.' (८८-८९.) दुष्टांच्या संगतीने कालीदेवीसही दुष्परिणाम भोगावे लागले असे वर्णन मुक्तेश्वराने केले आहे. (१.१२३.)

महिकावतीतील हनुमंताच्या परक्रमाने भयभीत झालेल्या भोपे, तेली, चाटे भाटे, वाणी, स्वैराचारी यांचे वर्णन करताना समाजातील स्वार्थी व विषय-लोलुप प्रवृत्तींवर मुक्तेश्वरांने टीका केली आहे. समकालीन समाजातील विकृतींची चांगली जाण मुक्तेश्वरास असल्याचे दोन प्रसंगांच्या या छोटयाशा काव्यातही उत्तमप्रकारे निर्दशनास येते. ‘भावार्थ रामायणातील लंकादहन प्रसंगी एकनाथांनी घडविलेल्या समाजघटकांच्या दर्शनाच्या कल्पनेशी साम्य असले तरी मुक्तेश्वराच्या वर्णनातील वेगळेपणा निश्चितच जाणवणारा आहे. मुक्तेश्वराचे प्रस्तुत ‘ अहि-महिरावण वध ’ हे कथाकाव्य आणि त्यानेच रचिलेले भावार्थ रामायणाचे ‘ उत्तरकांड ’ या ओवीबद्ध रचना पाहाता मुक्तेश्वरी संपूर्ण रामायण वाङमयीनदृष्टया किती सरस व वैशिष्टयपूर्ण झाले असते याची कल्पना करता येते.



---



अनुक्रमणिका






श्री. माधव दातार

# भाषावार प्रांतरचना : काही विचार

"नवभारत" च्या सप्टे. ७३ अंकातील "भाषावार राज्यरचनेचा फेरविचार" हा श्री. ना. बा. मराठे यांचा लेख वाचला. भाषावार राज्यरचना यशस्वी न झाल्याने प्रांताचे अस्तित्व नाहीसे करावे व एककेंद्री ( unitery ) राज्यव्यवस्था निर्माण करावी असे ते म्हणतात. ते कितपत शक्य व योग्य आहे याच नीट विचार करणे योग्य ठरेल.

भारत हा एवढा प्रचंड आहे की एककेन्द्री राज्यव्यवस्था या ठिकाणी राबवणे शक्य होणार नाही. सध्या आपण संघराज्यात्मक पद्धत अवलंबतो. पण प्रांतीय पातळीवरही विभाग पाडलेले आहेत. महाराष्ट्राचे शासकीय कारभारासाठी चार विभाग आहेतच. तेव्हा राज्यविधिमंडळाचे अस्तित्व संपुष्टात आणले व राज्यमंडळे बरखास्त केली तरी एवढ्या प्रचंड देशाचा कारभार जिल्हा हा भाग ठरवून चालणे कठीण आहे. राज्य विधिमंडळे व मंत्रिमंडळे रद्द झाली तरीही वेगवेगळे विभाग, उपविभाग होणे अपरिहार्य आहे. असे विभाग-उपविभाग झाले म्हणजे सत्तेचे काही प्रमाणात विकेन्द्रीकरण होणे अपरिहार्य आहे. ज्या रेल्वेचे श्री. मराठे उदाहरण देतात तिचे किती तरी झोन आहेत ? या प्रत्येक झोनचा कारभार बऱ्याच प्रमाणात स्वतंत्र रितीने चालतो. प्रत्येक झोनचे अंदाजपत्रक निराळे असते. तात्पर्य विधिमंडळे व मंत्रिमंडळे रद्द केली तरी विभाग-उपविभाग कायमच रहाणार. त्याला पर्याय नाही.

राज्यवहातूक महामंडळ, लघुउद्योग विकास महामंडळ अशा प्रकारची निरनिराळी महामंडळे जिल्हा पातळीवर राबवणे शक्य नाही व राज्यविधिमंडळे, मंत्रिमंडळे याचे अस्तित्व नष्ट झाले की बऱ्याच मोठ्या कारभारावर नोकरशाहीचे वर्चस्व रहाणार. ही गोष्टही लक्षात ठेवण्यायोगी आहे. देशात एकच कायदेमंडळ ( मध्यवर्ति संसद ) व एकच मंत्रिमंडळ राहिले तरी कारभाराच्या मोठ्या आकाराने विभाग-उपविभाग निर्माण करणे अटळ ठरून या विभाग-उपविभागात सत्ता वाटली जाईल. यामुळे नोकरशाहीलाच अधिक अधिकार मिळतील बाकी काहीच नाही.

सध्याच्या व्यवस्थेत सत्तेचे विकेंद्रीकरण झाल्याने लोकांच्या पाठिंब्याने निवडून आलेल्या राज्यसरकारांना स्वायत्तता मिळते. लोकशाहीच्या दृष्टीने हेच अधिक श्रेयस्कर आहे. लोकशाहीत नागरिकांनी निवडून दिलेले लोकप्रतिनिधी कारभार चालवतात. राज्यकर्ते आपलेच आहेत ही भावना रुजली





पाहिजे. एककेंद्री राज्यव्यवस्थेत नोकरशाहीला विशेष महत्व मिळून भारता-सारख्या विशाल देशात सरकारी नोकर आपल्यावर राज्य करीत आहेत अशी भावना उत्पन्न होते. या दृष्टीने सध्याची संघराज्यात्मक व्यवस्था विशेष उपयोगी ठरणारी आहे. काही राज्यात जिल्हा परिषदांच्या प्रयोगाने लोक-प्रतिनिधींच्या हाती आणखी जास्त सत्ता आली आहे. एककेंद्री राज्यव्यवस्था पत्करूनही विकेंद्रीकरण टाळता येत नाही. मग सत्तेचे विकेंद्रीकरण करायचेच तर राज्यविधिमंडळ व राज्यमंत्रिमंडळाच्या अस्तित्वाने ती जनतेच्या प्रति-निधींच्या हातात आली तर ते इष्टच आहे. सध्याच्या व्यवस्थेत लोकप्रतिनिधी हाती असलेल्या सत्तेचा जनकल्याणासाठी कितपत योग्य वापर करतात हा जरी वादाचा विषय असला तरी सध्याची व्यवस्थाच लोकशाहीच्या स्थिरतेसाठी योग्य आहे हे मान्य करायला हवे.

हा विचार प्रशासकीय दृष्टिकोनातून झाला. सध्याची व्यवस्था लोक-प्रतिनिधींच्या हाती सत्ता असल्याने नोकरशाहीस जनकल्याणासाठी चांगल्या रितीने राबवता येण्याची शक्यता आहे असे आपण म्हणू शकू. पण श्री. मराठे यांनी भाषिक प्रांताचा प्रश्न प्रांतीयभावनेच्या उद्रेकाच्या संबंधात उपस्थित केला आहे. आंध्रमधील हिंसाचाराने ते व्यथित झाले आहेत. व ही व्यथा मलाही आहे. हे ठीक असले तरी प्रांत आहेत म्हणून प्रांतियता बळावते हे समजणे कठीण आहे. प्रांतिक सरकार व प्रांतिक विधिमंडळाचे अस्तित्व जरी नाहीसे केले तरी प्रांतीय भावना नष्ट होईल असे मानण्यास काहीही आधार नाही. प्रांतियभावना प्रांत शिल्लक आहेत म्हणून अस्तित्वात आहे असे मुळीच नाही. वस्तुस्थिती याच्या उलट आहे. प्रांतियभावना आहे म्हणून प्रांत निर्माण करावे लागले. भारतासारख्या विशाल देशात विभिन्न भाषा, रहाणी-मानातील फरक, विभिन्न धर्म, विभिन्न रितीरिवाज इ. " विविधतेने नटलेल्या " देशात एककेंद्रीशासन टिकणे अशक्य होते. प्रत्येक माणसाला त्याच्या भाषेचा अभिमान असतो, 'केवळ माझा सह्यकडा' असे फक्त मराठी माणसालाच वाटते असे मानण्याचे कारण नाही. प्रत्येक प्रांतीयांना त्यांच्या प्रांतातील वैशिष्ठ्यांचा पुरेपुर अभिमान आहे. भाषिक अभिमान राष्ट्रीय एकात्मतेला घातक ठरू नये यासाठी भाषावार प्रांतरचना केली गेली. एक भाषा बोलणाऱ्यांनी एकत्र रहावे त्या भाषेचा अभिमान जरूर बाळगावा पण इतर भाषांचा द्वेष करू नये. प्रांतीय अभिमान राष्ट्रीयवादाला सुसंगत ठरावा हाच हेतू भाषावार प्रांतरचनेमागे होता. भाषावार प्रांतरचना वेळीच झाली नसती तर युरोपमध्ये ज्या प्रमाणे विभिन्न भाषेची निरनिराळी राष्ट्रे बनली तसे भारतात घडलेच नसते असे म्हणणे कठीण आहे.

भाशावार प्रांतरचना होऊनही स्वतंत्र आंध्र, स्वतंत्र तेलंगण अशा चळवळी का होतात हा प्रश्न येथे उपस्थित होतो. सध्या आंध्रप्रदेशात एकच भाषा बोलणारे लोक रहातात मग आंध्र विभाजनासाठी चळवळ का ? याचे कारण समान भाषा, समान सांस्कृतिक परंपरा या गोष्टी लोक एकत्र येण्यास मदत करतात पण तेवढया पुरेशा नसतात. एकत्र रहाण्याची इच्छा असणे सर्वात महत्वाचे. विकासाचा प्रादेशिक समतोल साधला नाही तर अविकसित प्रदेशात आपणावर अन्याय होत आहे ही भावना रुजते व ही भावना रुजली म्हणजे एकत्र रहाण्याची इच्छा नष्ट होते. मग एकभाषा हे बंधन एकत्र रहाण्यास पुरे होत नाही. आंध्रप्रदेशात असेच घडलंय. प्रथम तेलंगणच्या लोकांना आपल्यावर अन्यय होतोय असे वाटू लागले. आंध्रच्या मानाने तेलंगणात औद्योगिकरण नाही. तो भाग मागासलेला आहे. इ. या आधारे स्वतंत्र तेलंगणची चळवळ सुरु झाली. सध्या मुलकी नियम लागू झाल्याने " स्वतंत्र आंध्रची " चळवळ जोरात आहे. कारणे वेगवेगळी असतात पण कोणत्याही कारणाने जनतेत आपणावर सध्याच्या व्यवस्थेत अन्याय होतोय ही भावना रुजली म्हणजे व्यवस्था बदलण्याची मागणी होते. बंगाली लोकांतही पृथगात्मतेची भावना उर्दु भाषेची सक्ती व असमतोल आर्थिक विकास या दोन कारणांमुळेच निर्माण झाली.

प्रांतीयतेची, फुटीरतेची कारणे ही अशी आहेत. त्यावर उपाय प्रांतिक-सरकारचे अस्तित्व नाहीसे करणे हा असू शकत नाही. डोके दुखत असेल तर डोके फोडणे या सारखे ते ठरेल. समतोल आर्थिक विकासाचे धोरण यापुढे विशेष काळजीपूर्वक ठेवायला हवे. कारण आर्थिक प्रश्नांना मानवी जीवनात महत्वाचे स्थान आहे. मोठे उद्योगधंदे देशाच्या प्रत्येक भागात उभारता येणे शक्य नाही. पण तुलनेने अविकसित प्रदेशात स्थानिक परिस्थितीनुरूप लघु-उद्योगांचा विकास करता येईल. असा कार्यक्रम राष्ट्रीय पातळीवर व राज्य-पातळीवर घेतला जाणे आवश्यक आहे. शेवटी एक बिनमहत्वाचा मुद्दा. एक-केन्द्री राज्यव्यवस्था कशी " इष्ट " ठरणार नाही याचा विचार आपण केला पण सध्याच्या संघराज्यात्मक व्यवस्थेचे एककेन्द्री रूपांतर करणे शक्य आहे काय याचाही विचार करायला हवा. संघराज्यात्मक व्यवस्थेचे एककेन्द्री व्यव-स्थेत रूपांतर संसदेच्या साध्या बहुमताच्या ठरावाने किंवा २।३ बहुमताने होऊ शकेल काय याबद्दल मला शंका आहे. संघराज्यात्मक व्यवस्था ही बाब महत्वाची आहे. व ही पद्धत बदलायची ठरल्यास हा निर्णय संसदेला घेता येणार नाही त्यासाठी घटनासमितीच बोलवावी लागेल.



अनुक्रमणिका

## पुस्तक-परामर्श

### तर्कदीपिका –

द्वितीयावृत्ती ( १९७३ ) ले. प्रा. ब. वि. अकोलकर,

व्हीनस प्रकाशन, पुणे, पृ. २१८. मूल्य रु. ८ फक्त.

पुणे विद्यापीठाच्या प्रथम वर्ष बी. ए. या वर्गाच्या परीक्षेसाठी तर्कशास्त्र या विषयावरील नव्या अभ्यासक्रमाला धरून लिहिलेले प्रा. अकोलकरांचे "तर्कदीपिका" हे पुस्तक पारंपरिक आणि आधुनिक अशा दोन्ही तर्कशास्त्रांची ओळख करून देणारे आहे. नुकतेच द्वितीयावृत्तीत त्याने केलेले पदार्पण ही अभिनंदनीय घटना आहे. नवीन अभ्यासक्रमानुसार प्रकरणे एक ते सहा यातील संहतिसिद्धान्ताचे प्रकरण सोडल्यास बाकी सर्व पारंपरिक तर्कशास्त्राचे विवेचन करतात. बाकीची प्रकरणे सात ते दहा आधुनिक तर्कशास्त्राचा परामर्ष घेतात.

प्रकरण १ प्रस्तावनावजा असल्याने त्यात तर्कशास्त्राचे सामान्य स्वरूप, त्याचे आकारिक व आदर्शात्मक स्वरूप व अनुमानाचे सर्वसामान्य स्वरूप इत्यादी भाग येऊन गेलेला आहे. यापैकी अनुमानाचे स्वरूप सांगत असताना प्रा. अकोलकरांनी आधारविधाने आणि निष्कर्षविधान यांतील लक्षिततासंबंध आणि निष्कर्षाचे आधारविधानापासून केलेले निर्योगीकरण ( detachment) या आधुनिक तर्कशास्त्रातील कल्पनांच्या स्वरूपात अनुमानस्वरूप प्रकट केले आहे. या व्यतिरिक्त विधाने अक्षरांनी चिन्हांकित करून अनुमानातील त्यांचे संबंध चिन्हांकित भाषेत मांडले आहेत. या चिन्हीकरणातील मर्म वाचकांना समजण्यासाठी त्यांना या चिन्हीकरणाची पूर्वमाहिती हवी. पण ती पहिल्याच प्रकरणात देणे शक्य होत नाही. तेव्हा विषयाची ओळख करून देत असताना विषय सोपा वाटावा व समजावा म्हणून तंत्रविरहित (non-technical) भाषेतच ती करून देणे आवश्यक आहे. प्रा. अकोलकरांनीच पूर्वी लिहिलेल्या "तर्कमंजरी" या उत्कृष्ट पुस्तकातील पहिल्या प्रकरणाप्रमाणेच "तर्कदीपिके" चे पहिले प्रकरण ठेविले असते तर वाचकांना ते अधिक चांगल्या रीतीने समजले असते.

या पहिल्या प्रकरणात अनुमानाचे स्वरूप लक्षितताधर्माच्या (implication) कल्पनेचा वापर करून स्पष्ट केलेले आहे; परंतु हे करीत असताना "लक्षितता" हा कोणता धर्म आहे हे मात्र त्यांच्या विवेचनाने स्पष्ट होत नाही. उपर्युक्त धर्म व्यक्त करण्याऱ्या विधानांचा आकार "जर–तर–" असा

असतो. परंतु वरील धर्माची त्यांनी दिलेली उदाहरणे पाहता "जर-तर-" ने संबंधित असलेली विधाने सत्यताफलात्मक औपाधिक समस्तविधाने (truth -functional implicative compound propositions) नाहीत. प्रा. अकोलकरांनी दिलेले "जर धूम्रपान केले तर कॅन्सर होतो" हे विधान कारणकार्य संबंधावर आधारित आहे. अर्थात् यांचे अर्थ एकमेकांशी बद्ध आहेत. या विधानाचे चिन्हीकरण '⊃' या चिन्हाचा उपयोग करून केलेले आहे. पण '⊃' चा उपयोग material conditional (or implication) व्यक्त करण्यासाठी होतो. या चिन्हाचा अर्थ असा की प सत्य व फ असत्य असे आढळत नाही. व्यावहारिक भाषेत "जर-तर-" हा शब्दप्रयोग अनेक अर्थांनी वापरलेला दिसतो, पण त्या सर्वांना समान असा "जर-तर-" चा वर व्यक्त केलेला अर्थच आधुनिक तर्कशास्त्रात विचारात घेतला जातो. "जर-तर-" ने व्यक्त होणारी व्यवहारातील विधाने आधारविधाने व निष्कर्षविधान हा संबंध व्यक्त करणारी किंवा कारण-कार्य संबंध किंवा अन्य संबंध व्यक्त करणारी असतात. जर ती सर्व विधाने '⊃' या चिन्हाने चिन्हांकित केली, तर त्यांचे विशिष्ट जर-तर अर्थ नष्ट होऊन पूर्वांग सत्य आणि उत्तरांग असत्य अशी वस्तुस्थिति नाही एवढाच अर्थ उरतो. पण लक्षितता धर्म स्पष्ट करण्यासाठी जे उदाहरण प्रा. अकोलकरांनी घेतलेले आहे ते कारण-कार्य संबंध व्यक्त करणारे आहे. ते विधान '⊃' ने सूचित होणारे जे 'material implication' त्याची कोणतीही कल्पना आपणास देत नाही. येथे हे सांगणे उचित ठरेल की material implication हा संबंध व्यक्त करणारी विधाने केवल सत्यासत्य याच कल्पनांनी बद्ध असतात, अर्थांनी नव्हे. "जर सूर्य थंड असेल, तर २+२=४" यातील जर-विधान तर-विधानाला वरील अर्थाने लक्षित करते असे म्हणता येईल, व याच संदर्भात हे विधान 'प ⊃ फ' या तऱ्हेने चिन्हांकित करता येईल. तेव्हा जर कोणतेही "जर-तर," विधान "⊃" या स्वरूपात चिन्हांकित करावयाचे असेल तर "⊃" चा तार्किकदृष्ट्या संमत असा अर्थ अगोदर व्यक्त करून दिलेले विधान हा अर्थ व्यक्त करते हे दाखविणे आवश्यक आहे. म्हणजे "जर तर" विधानाचा कोणताही प्रकार घेतला तरी त्यात पूर्वांग सत्य आणि उत्तरांग असत्य असा प्रसंग येत नाही, हा समान आंशिक अर्थ असतो हे दाखवावयास हवे. आणि याबरोबरच "जर-तर-" हे संबंधक साध्या भाषेतील नसून सत्यताफलात्मक संबंधक असल्याने परस्परसंबंध नसलेल्या आशयांची विधाने घेऊनही हा धर्म व्यक्त करता येतो हेही दाखवावयास हवे.

वर उल्लेखलेला लक्षिततताधर्म स्पष्ट करीत असताना प्रा. अकोलकरांनी दिलेली उदाहरणे जशी कारण-कार्य हा संबंध व्यक्त करणारी आहेत, तशीच ती logical or tautologous implication व्यक्त करणारीही आहेत. एखाद्या वैध युक्तिवादातील आधारविधाने व निष्कर्षविधान ही जर "जर-तर-" या संबंधकांनी जोडली, तर त्यांचा संबंध अनिवार्य ( necessary ) असेल हे स्पष्टच आहे. हा संबंध त्यांनी $[(p \supset q) . p] \supset q$ या सर्वतः सत्य विधानाने ( tautology ) व्यक्त केलेला आहे. ( पाने ९-११, व १५ पहा ) परंतु "जर धूम्रपान केले तर कॅन्सर होतो" हें जर-तारी विधान, आणि "जर धूम्रपान केले तर कॅन्सर होतो, आणि जर बहुतेक लोक धूम्रपान करीत असतील, तर त्यांना कॅन्सर झालेला असणार" हे जर-तारी विधान यातील लक्षिततेत बराच भेद आहे. यापैकी पहिल्या विधानाचा अर्थ इतकाच की धूम्रपान करणारे लोक आहेत पण त्यांना कॅन्सर झालेला नाही असे आढळून येत नाही. जर तशी वस्तुस्थिति आढळली, तर ते विधान केवळ असत्य ठरते पण ते कधीही व्याघाती (contradictory) ठरत नाही. तेव्हा वरील प्रकारच्या कोणत्याही यदि-विधानात पूर्वांग सत्य व उत्तरांगही सत्य असणे हे तार्किकदृष्ट्या अनिवार्य नाही. हीच गोष्ट वेगळ्या भाषेत सांगावयाची झाल्यास असे म्हणता येईल की प ⊃फ हे लक्षिततताधर्म व्यक्त करणारे यदि-विधान नैमित्तिकतया सत्य ( contingently true ) आहे. पण दुसऱ्या जर-तारी विधानाचा रोख वेगळा आहे. त्यात पूर्वांग सत्य पण उत्तरांग असत्य आढळणे शक्य नसते; तसे आढळल्यास व्याघात निर्माण होईल. लक्षिततादर्शक चिन्ह जरी एकच असले तरी $p \supset q$ व $[(p \supset q) \cdot p] \supset q$ या दोन विधानांच्या लक्षिततेत ( implication) बराच भेद आहे. यापैकी दुसऱ्या प्रकारच्या विधानातील लक्षितता-संबंधच वैध अनुमानाला अभिप्रेत आहे, पहिल्यातील नाही. तेव्हा नैमित्तिकतया सत्य असलेल्या विधानातील लक्षितता आणि सर्वतः सत्य असलेल्या विधानातील लक्षितता यात भेद करणे आवश्यक आहे. वरील दोन्ही विधानातील लक्षितता धर्म '⊃' या एकाच चिन्हाने जरी व्यक्त करण्यात आलेला असला, तरी दुसऱ्या प्रकारची लक्षितता ( म्हणजे logical or tautologous implication) व्यक्त करण्यास ते चिन्ह पुरेसे आहे. सत्यताफलात्मक तर्कशास्त्राचे हे एक वैशिष्टय आहे की द्रव्यात्मक लक्षितता ( material implication ) हा दोन विधानातील सर्वात निर्बल असा लक्षिततताधर्म ( weakest of all implications ) आहे असे मानून त्यापासून तार्किकीय ( logical )

लक्षितता या प्रबलतम लक्षिततेची निष्पत्ति तार्किकांनी केलेली आहे.

आधुनिक तर्कशास्त्राच्या संदर्भात पान १२१ वर लक्षिततफलनाची कल्पना अधिक स्पष्ट केली जाईल अशी कल्पना होती; पण ती कल्पना स्पष्ट करण्यात आलेली नाही. परंतु विधानांचे चिन्हीकरण करताना मात्र " $\supset$ " ची योजना करण्यात आलेली आहे. वरील धर्म व्यक्त करणारी विधाने मात्र प्रकरण १ प्रमाणेच केवळ कारणकार्य संबंध असलेली उदाहरणे देण्यात आलेली आहेत. अशा परिस्थितीत " $\supset$ " या चिन्हाचा लेखकाच्या मते अर्थ काय आहे हेच कळत नाही. तसेच material implication ची कल्पना गृहीत धरून लक्षिततेची उदाहरणे दिलेली आहेत असे म्हणण्यासही पुरावा मिळत नाही.

तर्कशास्त्राचे आकारिक स्वरूप प्रतीके किंवा चिन्हे वापरून अधिक स्पष्टपणे व्यक्त होते हे निःसंशय, पण आधुनिक तर्कशास्त्रात मान्य झालेल्या चिन्हांचा सुरवातीलाच उपयोग केल्यास त्याची आकारिकता यथार्थतेने किंवा सुलभतेने व्यक्त होईल असे वाटत नाही. " तर्कशास्त्रात प्रतीकांचा वापर " या शीर्षकाखाली पहिल्याच प्रकरणात प्रमुख तार्किकीय संबंधके ( logical connectives ) सांगून त्याच्या साहाय्याने नेहमीच्या व्यावहारिक भाषेतील विधाने कशी चिन्हांकित केली जातात हे लेखकाने सांगितले आहे. पण चिन्हांकनाने आकार कसा ओळखला जातो ते यामुळे मुळीच स्पष्ट झालेले नाही. विधानांचा किंवा अनुमानांचा आकार स्पष्ट होण्याकरिता एकाच तऱ्हेची अनेक विधाने किंवा अनुमाने चिन्हांकित करणे आवश्यक होते. पण ते करण्याऐवजी केवळ एक युक्तिवाद चिन्हांकित करण्यात आलेला आहे. तो असा : " ईश्वर जगातील निर्घृणता रोखू इच्छित असेल ( e ), पण तसे करण्यास समर्थ नसेल ( $\sim$ s ), तर तो निर्बल होय ( n ). जर तो तसे करण्यास समर्थ असेल ( s ), पण करण्याची इच्छा नसेल ( $\sim$ e ), तर तो दुष्टबुद्धि ठरतो बरे, तो रोखू शकत असेल व इच्छितही असेल ( s.e ), तर मग जगात निर्घृणता असायला नको ( $\sim$ N ). परंतु निर्घृणता आहे ( N ). त्याअर्थी तिचा कोठेतरी उगम असला पाहिजे ( U )."

या युक्तिवादाच्या

( १ ) $(e \cdot \sim s) \supset n$

( २ ) $(s \cdot \sim e) \supset d$

( ३ ) $(s \cdot e) \supset \sim N$

( ४ ) N

$/ \therefore U$ .

– अशा चिन्हीकरणाने काहीही बोध होत नाही. दुर्दैवाची गोष्ट अशी की हे अनुमान अवैध ( invalid ) आहे. लघुसत्यता कोष्टकावरून ( shorter truth-table method ) त्याची अवैधता पडताळून पाहता येते.

वरील युक्तिवादाच्या अवैधतेची कारणे फार महत्त्वाची आहेत. आपली नेहमीची भाषा ( ordinary language ) बरीचशी vague आणि ambiguous असते. अशा भाषेतील विधानात अन्य विधाने प्रच्छन्नपणे असणे शक्य असते. वरील विधानांचे चिन्हीकरण करीत असताना या सर्व लक्षित ( implied ) पण प्रच्छन्न विधानांचा परामर्ष घेणे आवश्यक असते. प्रस्तुत युक्तिवादात " जे निर्घृण आहे त्याचा उगम असला पाहिजे " हे गृहीत विधान प्रच्छन्नपणे आहे, परंतु चिन्हांकित युक्तिवादात मात्र ते आलेले नाही. यामुळे आधारविधाने निष्कर्षाचे निष्पादन करण्यास अपर्याप्त (व म्हणून असमर्थ) ठरतात. वरील प्रच्छन्न विधान $N \supset U$ असे चिन्हांकित करता येईल, व नंतर $N \supset U$ आणि N यांच्या साहाय्याने विधायक संघाताच्या नियमाचा (Modus Ponens ) उपयोग करून U या विधानाचे निष्कर्ष म्हणून निष्पादन होऊ शकेल. वास्तविक हे प्रच्छन्न आधारविधान आणि शेवटचे (४) आधारविधान हीच निष्कर्षाच्या निष्पादनाला पुरेशी आहेत. बाकीची सर्व नाममात्र ( redundant ) आहेत. येथे सुरवातीलाच वरवर आधारविधाने भासणारी पण वास्तवात निष्कर्षाच्या निष्पादनात काहीही उपयोग नसलेली विधाने असलेले अनुमान विचारात न घेणे इष्ट झाले असते. पण बहुधा वरील युक्तिवाद अवैध आहे, याची प्रा. अकोलकरांना कल्पना नसावी.

भाषेच्या वर उल्लेखिलेल्या दोन त्रुटींमुळे विधाने तार्किकदृष्टचा अयथार्थ ( logically inappropriate ) स्वरूपात व्यक्त केली जातात. अशा विधानांच्या जागी अ, ब, क इत्यादी अक्षरे ठेवल्याने चिन्हीकरण होणार नाही. विधानांचे योग्य ते अर्थ व्यक्त होतील अशा रीतीने त्यांची पुनर्रचना करून त्यांचे चिन्हीकरण करणे हे कार्य आधुनिक तर्कशास्त्राने आपल्या सामग्रीने शक्य व सुकर केलेले आहे. आधुनिक तर्कशास्त्रच केवळ शिकण्याच्या आग्रहामागे हाही एक महत्त्वाचा उद्देश आहे. तार्किकदृष्टचा निर्दोष आणि केवळ आकारिक स्वरूपाची भाषा ( formalized language ) कशी असते हे आधुनिक तर्कशास्त्राच्या अभ्यासाने यथार्थतेने कळते.

प्रकरण सात पासून आधुनिक तर्कशास्त्राच्या विचारास सुरवात झालेली आहे. या प्रकरणाचे नाव जरी " मूलभूत तार्किक प्रक्रिया " असे दिलेले असले

तरी " मूलभूत " नसलेल्या बऱ्याचशा बाबी लेखकाने प्रक्रियांच्या अगोदरच या प्रकरणात समाविष्ट केलेल्या आहेत. या प्रकरणाच्या सुरवातीलाच प्रमुख तार्किक संबंधकांची ओळख करून देऊन त्यांच्या व्याख्या सत्यताकोष्टकाच्या साहाय्याने करावयास हव्यात. पण त्या ऐवजी चर, अचर, व तर्ककारक यांच्या प्राथमिक विवेचनानंतर त्यांतील अचरांच्या व्याख्या सत्यताकोष्टकांच्या साहाय्याने न करता स्थानविपर्ययाचे तत्व ( Principle of Commutation ), विग्रहाचा नियम ( Law of Addition ), पुनरुक्ति नियम ( tautology ), यदि-विधानाची व्याख्या व त्याचे अन्य प्रकारच्या विधानात रूपांतर, डी मॉर्गनचे सिद्धांत ( प्रा. अकोलकरांनी केवळ " मॉर्गनचे सिद्धान्त " असा उल्लेख केलेला आहे, ते बरोबर नाही, ) व सममूल्यता इत्यादी भाग विचारात घेतलेला आहे. हा संपूर्ण भाग संबंधकांच्या व्याख्या झाल्यावर विचारात घ्यावयास हवा होता. यामुळे विवेचनाचा तार्किक क्रम ( logical order ) मोडल्यासारखे वाटते.

स्थानविपर्ययाच्या संदर्भात प्रा. अकोलकर लिहितात " ... दोन विधानात असलेल्या ' आणि ' ने कधी कधी दोन घटनांमधील विशिष्ट प्रकारचा संबंध अभिप्रेत असतो. अशावेळी त्या दोन विधानांचा स्थानविपर्यय करणे तर्कयुक्त ठरणार नाही. उदा० पाऊस थांबला आणि त्याने छत्री मिटली. घरावर घुबड बसले आणि सासू वारली, इत्यादी. " हे विवेचन यथार्थ नाही, कारण आपण अभ्यासत असलेल्या सत्यताफलात्मक तर्कशास्त्रात विधानांच्या केवळ सत्यासत्यतेचा विचार येतो, अर्थाचा नाही. आणि जी गोष्ट " आणि " या संबंधकाबाबत आहे तीच गोष्ट " अथवा " या संबंधकाबाबतही आहे. " अथवा " या संबंधकाने जोडली जाणारी पण घटकविधानांचा विपर्यय केल्यास अर्थभेद होणारी विधाने लेखकाने उदाहरणादाखल दिलेली नाहीत. त्यांच्या मते " ... ' अथवा ' ने एकत्र आणलेल्या घटकविधानांची स्थाने बदलली तरी त्या वैकल्पिक विधानांचा अर्थ कायम राहतो व अर्थात् त्याची सत्य / असत्यता बदलत नाही " ( पान १२० ). पण अशी उदाहरणे देता येतील. त्यातील एक उदाहरण असे : " एकतर रमेशने आवाज करणे बंद करावे अथवा वर्गाबाहेर निघून जावे. " वरील विधानांत घटकविधानांचा स्थानविपर्यय केल्यास अर्थ बदलेल हे उघड आहे, पण सत्यताफलात्मक तर्कशास्त्राच्या संदर्भात हा स्थानविपर्यय तर्कदुष्ट ठरणार नाही. स्थानविपर्ययासंबंधी प्रा. अकोलकरांची धारणाच मुळी चुकीची वाटते. त्यांच्या मते " तर्ककारकाने ( " आणि " व " अथवा " यांनी ) जोडल्या गेलेल्या घटकविधानांचा क्रम जरी

बदलला तरी संयुक्त विधानांचा अर्थ कायमच राहतो व त्याची सत्यासत्यताही बदलत नाही " ( पान ११९ ). हेहि म्हणणे यथार्थ नाही. कारण लगेच त्यांनी अर्थभेदाची उदाहरणे दिलेली आहेत. पान १६८ वर स्थानविपर्ययाच्या तत्त्वाच्या संदर्भात ते पुन्हा म्हणतात, " ... दोन विधानांची सममूल्यता असली तर या दोन विधानांची स्थाने बदलली तरी यामुळे अर्थ तोच रहातो ". याला अपवाद म्हणून ते पुढे लिहितात, " ...... 'आणि' या शब्दाने जर 'आधी व नंतर' असा केवळ कालिक संबंध व्यक्त होत असेल तेव्हा स्थानविपर्यय होत नाही. "

वर म्हटल्याप्रमाणे वस्तुस्थिती अशी आहे की आधुनिक तर्कशास्त्रात विधानांच्या अर्थाला स्थानच नाही. स्थान आहे ते फक्त सत्यासत्यतेला. ही सत्यासत्यता " आणि " व " अथवा " या संबंधकांनी बद्ध असलेल्या विधानांच्या बाबतीत विधानांची अदलाबदल जरी केली तरी अबाधितच रहाते हा स्थानविपर्ययाचा नियम आहे. यावरून तर्कशास्त्राच्या आकारिकतेवरही पुरेसा प्रकाश पडू शकतो. सत्यासत्य या कल्पनेबरोबरच अर्थालाही स्थानविपर्ययाच्या नियमात गोवणे हे तर्कसंमत नाही. येथे हे लक्षात ठेवणे आवश्यक आहे की सर्व तार्किकीय संबंधके सत्यताफलात्मक मानली गेली आहेत. याचा अर्थ असा की, सर्व संबंधकांचे अर्थ सत्यासत्यतेच्या तत्त्वावरच निश्चित करावयाचे असतात. त्या संबंधकांचे व्यावहारिक भाषेतील अर्थ किंवा अर्थछटा यांना सत्यताफलात्मक तर्कशास्त्राच्या संदर्भात स्थान नाही.

" विग्रहतत्त्व " या शीर्षकाखाली जी कल्पना स्पष्ट करण्यात आलेली आहे त्यात मूळ विधान व $\vee$ चिन्हाने नवीन ( $p \vee q$ ) असे तयार झालेले विधान यांचा काय संबंध आहे तेच सांगितलेले नाही. हाच संबंध तर्कशास्त्रदृष्टचा महत्वाचा आहे. या तत्त्वाची प्रतिज्ञा अशी की जर एखादे विधान सत्य असेल तर त्याला "अथवा" ( $\vee$ ) या चिन्हाच्या साहाय्याने कोणतेही सत्य अथवा असत्य विधान जोडता येते. उदा० प या सत्य विधानापासून ( प $\vee$ फ ) असे संयुक्त विधान आपणास तयार करता येते. प जर सत्य असेल तर (प $\vee$ फ) हे सत्यच असेल व प आणि फ जरी दोन्ही असत्य असली तरी प $\supset$ (प $\vee$ फ) हे विधान सत्यच असेल. सत्यताकोष्टकावरून असे दिसून येते की वरील यदि-विधान सर्वतः सत्यविधान आहे. या विधानावरच विग्रहतत्त्वाची रचना झालेली आहे. हे तत्त्व एकतर वर मांडल्याप्रमाणे सर्वतः सत्य विधानाच्या स्वरूपात मांडता येईल किंवा प / ∴ (प $\vee$ फ ) या अनुमाननियमाच्या स्वरूपात मांडता येईल. तेव्हा मूळविधान आणि विग्रहित विधान यांचा संबंध सर्वतः सत्य यदिविधानांचा आहे याचा उल्लेख करणे आवश्यक आहे.

" विग्रह " हे नाव मुळीच अन्वर्थक वाटत नाही. इंग्रजीत या तत्त्वाला ( principle of addition ) असे नाव आहे. याच्या प्रतिज्ञेनुसार प या सत्यविधानापासून ( प ∨ फ ) असे वैकल्पिक संयुक्तविधान आपणास तयार करता येते. या ठिकाणी आपण एका विधानाला दुसरे विधान जोडीत आहोत, व या संदर्भात " विग्रह " हा शब्द नेमका उलटया अर्थाचा वाटतो. त्याऐवजी या तत्त्वाला " योगाचा नियम " असे नाव देणे योग्य वाटते. ( प ∨ फ ) या संयुक्त विधानात प आणि फ ही केवल विधाने " ∨ " या चिन्हाने विभक्त केलेली आहेत. तेव्हा या दोन विधानांचा ( प ∨ फ ) या संयुक्त विधानात विग्रह ( disjunction ) आहे असे म्हणण्यास काहीच प्रत्यवाय येत नाही. पण ज्याला प्रा. अकोलकर विग्रहतत्त्व म्हणतात त्याचे स्वरूप योगाचे आहे– वियोगाचे नाही. वर उल्लेखिल्याप्रमाणे वरील तत्त्व (१) प ⊃ ( प ∨ फ ) किंवा (२)प / ∴ (प ∨ फ) या तऱ्हेने व्यक्त करता येईल. ( प ∨ फ ) हे विधान ( १ ) व ( २ ) पासून पूर्णपणे भिन्न आहे, व ही भिन्नता व्यक्त करण्यासाठी एकाच पारिभाषिक शब्दप्रयोगाची योजना करून चालणार नाही. ' विग्रह ' या शब्दाचा अर्थही addition या इंग्रजी शब्दाला अनुकूल नाही. त्याचा संस्कृत शब्दकोशातील अर्थ ताणणे, पृथक्करण करणे ( पाहा गीर्वाणलघुकोश– ले. ज. वि. ओक ) इत्यादी असून तो disjunction या शब्दाशी जुळणारा आहे.

" मूलभूत सत्यताफलने व सत्यकोष्टके " या शीर्षकाखाली प्रमुख संबंधकांची सत्यताकोष्टके दिलेली आहेत. यापैकी " नाही " ( ∼ ) या संबंधकाचे कोष्टक देत असताना ∼ प ची मूल्ये Lukasiewics च्या द्विमूल्यनाच्या नियमावर ( principal of bivalence ) आधारलेली आहेत हे लक्षात ठेवणे आवश्यक आहे. आपण अभ्यासत असलेले तर्कशास्त्र द्विमूल्यी ( two-valued ) आहे. बहुमूल्यी ( many-valued ) तर्कशास्त्राच्या संदर्भात या संबंधकांची मूल्ये बदलतील.

लक्षितता फलनाचे ( implicative function ) सत्यताकोष्टकानुसार दिलेले सत्यतामूल्य अवलोकिले असता दोन निष्कर्ष काढता येतात. ( १ ) सत्य विधान कोणत्याही सत्य / असत्य विधानापासून लक्षित ( व्यंजित ) होते, आणि ( २ ) असत्य विधान कोणत्याही सत्य / असत्य विधानाला लक्षित (व्यंजित) करते. या विपर्यस्त वाटणाऱ्या पण सत्यताफलात्मक तर्कशास्त्राच्या संदर्भात तशा नसणाऱ्या निष्कर्षांना " द्रव्यात्मक व्यंजनाचे विरोधाभास "

( paradoxes of material implication ) असे नाव दिले जाते. या विरोधाभासांचा उल्लेख व चर्चा या संदर्भात देणे आवश्यक आहे.

द्रव्यात्मक सममूल्यता ( material equivalence ) आणि तार्किकीय सममूल्यता (logical equivalence) यात भेद आहे. सममूल्यतादर्शक विधान हे जेव्हा स्वतःच सर्वतः सत्य विधान असते, तेव्हा त्या सममूल्याला तार्किकीय सममूल्य असे नाव दिलेले आहे. डी मार्गनचे सिद्धान्त, ( प ⊃ फ ) च्या दोन्ही व्याख्या, तसेच खुद्द द्रव्यात्मक सममूल्यतेची व्याख्या ही सर्व तार्किकीय सममूल्यतेचीच उदाहरणे आहेत. पण सममूल्यतेच्या संदर्भात तार्किकीय सममूल्यतेचा विचार न आणताच आणि सममूल्यतेचा विचार करण्याअगोदरच तार्किकीय सममूल्यतेची उदाहरणे दिलेली आहेत. ( पाहा पाने १२२–१२६ )

प्रबल आणि निर्बल विकल्पांची सत्यताकोष्टके त्यांच्या अर्थावरून जशी स्वतंत्रपणे काढता येतात तसे एकावरून दुसऱ्या विकल्पाचे सत्यताकोष्टक तयार करता येते. आधुनिक तर्कशास्त्र आपली सर्व प्रमेये एका निगामी प्रणालीत ( deductive system ) बद्ध करून काही अल्पतम गृहीतांच्या साहाय्याने कशी निष्पादित करता येतात ते सांगते. कमीत कमी सामग्रीने ( गृहीतांनी ) सर्व प्रमेयांची उपपत्ती लावणे व त्यांचे परस्परसंबंध प्रस्थापित करणे हे कोणत्याही शास्त्राचे आदर्श स्वरूप मानले जाते. यानुसार प्रबल व निर्बल विकल्प यांची दोन स्वतंत्र सत्यताकोष्टके न मानता निर्बल विकल्पापासून प्रबल विकल्पाची व्याख्या करता येते. ती अशी : (प ∨ फ) हा निर्बल विकल्प आहे याचा अर्थ असा की एकतर प सत्य आहे अथवा फ सत्य आहे अथवा ( प . फ ) सत्य आहे. परंतु प्रबल विकल्पाचा अर्थ केवळ प सत्य किंवा फ सत्य एवढाच आहे. म्हणजे येथे ( प · फ ) या शक्यतेला स्थान नाही. तेव्हा ( प ≠ फ ) ( प्रबल "किंवा" ) याची व्याख्या "प सत्य किंवा फ सत्य पण दोन्ही सत्य असे नाही" अशी होईल व तिचे चिन्हीकरण (प ≠ फ) = [ ( प ∨ फ ) ~ ( प · फ ) ] व्याख्या असे होईल. सत्यताकोष्टकाच्या साहाय्याने ( प ≠ फ ) चे मूल्य वरील व्याख्येवरून काढता येईल.

प्रकरण ९ मध्ये नैगमनिक सिद्धतेचा विचार आलेला आहे. त्यात सुरवातीला नैगमनिक सिद्धतेसाठी आवश्यक असणाऱ्या सर्व सूत्रांची यादी दिलेली आहे. या बाबतीत खालीलप्रकारे प्रतिक्रिया व्यक्त करता येईल.

( १ ) यातील सुरवातीचे तीन नियम म्हणजे पारंपरिक तर्कशास्त्रातील " विचार-नियम " होत. परंतु यांचा उल्लेख करण्याचे प्रयोजन कळले नाही. नैगमनिक सिद्धीत याचा आपण उपयोग करीत नाही. आधुनिक तर्कशास्त्रानुसार सर्व तर्कसूत्रे सर्वतः सत्य विधानेच असल्याकारणाने विचार-नियमांचे स्थान इतर कोणत्याही सर्वतः सत्य विधानाहून श्रेष्ठ आहे असे मानण्याचे कारण नाही.

( २ ) तर्कनियमांचे दोन भाग करणे इष्ट वाटते. तर्कप्रक्रियेत अनुमान निष्पन्न होत असल्याने काही नियम हे अनुमान निष्पादित करण्याचे नियम ( Rules of Inference ) या नावाने संबोधले गेले पाहिजेत. काही नियम अनुमानाच्या नियमांना साहाय्यक आहेत. त्यांना प्रतिनिवेशाचे किंवा आदेशाचे नियम ( Rules of Substitution ) असे म्हणता येईल. हे दुसऱ्या प्रकारचे नियम तार्किकीय सममूल्ये असल्याने एका विधानाच्या जागी त्याचे सममूल्य असे दुसरे विधान ठेवता येते. त्यामुळे विधानांची सत्यासत्यता बदलत नाही व अनुमानप्रक्रियेस मदत होते. तेव्हा पाने १६६–६७ वरील नियम क्र. ४ ते १२ हे अनुमानांचे नियम या नावाने संबोधले जावेत व त्यांचे स्वरूपही अनुमानाच्या आकारातच व्यक्त व्हावे. प्रा. अकोलकरांनी हे नियम सर्वतः सत्य अशा यदि विधानाच्या स्वरूपात मांडले आहेत. परंतु सर्व सत्य विधान म्हणजे अनुमान नव्हे. सर्वतः सत्य यदि विधानापासून अनुमानप्रक्रिया वेगळी काढता येते, व त्यापासून अनुमाननियम तयार करता येतो. सरलीकरणाचा नियम सर्वतः सत्य यदि विधानाच्या स्वरूपात दिलेला आहे. तो

( प·फ ) / ∴ प किंवा

( प·फ ) / ∴ फ या स्वरूपात मांडता येईल.

– याप्रमाणे नियम क्र. १२ पर्यंत सर्व तर्कसूत्रांची पुनर्रचना करावयास हवी. तसेच नियम क्र. १३ ते २३ पर्यंतच्या सर्व नियमांना प्रतिनिवेशाचे नियम म्हटले जाते. नियम २१ व २२ एकाच नियमाची स्थानविपर्यय केल्याने झालेली दोन रूपे आहेत. तेव्हा नियम क्र. २२ या नियमाची आवश्यकता वाटत नाही.

( ३ ) नैगमनिक सिद्धतेच्या प्रत्यक्ष सिद्धता, सोपाधिक सिद्धता, व अप्रत्यक्ष सिद्धता या तीन सिद्धान्तापैकी सोपाधिक सिद्धतेचे केवळ तंत्र सांगितले आहे. ही सिद्धता ज्या तत्त्वावर अवलंबून आहे ते तत्त्व सांगणे आवश्यक आहे.

अप्रत्यक्ष सिद्धतेच्या साहाय्याने अनुमानांची वैधता ठरवीत असता निष्कर्ष असत्य मानून पुढे व्याघात निर्माण होईपर्यंत अनुमानाचे निष्पादन करीत जाणे व व्याघात निर्माण झाल्यावर तेथेच थांबणे यात एक त्रुटि आहे व ती म्हणजे व्याघात निर्माण झाला याचा अर्थ मूळ अनुमान वैध आहे असा असून या ठिकाणी अनुमानाची सिद्धता संपली आहे असे मानणे. पण त्याही पुढे जाऊन निष्कर्षाचे निष्पादन करणे शक्य आहे. " व्याघातापासून कोणताही निष्कर्ष निघू शकतो " या नियमानुसार व्याघाताच्या पायरीनंतर केवळ दोन पायऱ्यातच निष्कर्षाचे निष्पादन होऊ शकते. पान १७९ वरील उदाहरणात १२ व्या पायरीवर ( c · ∼ c ) असा व्याघात आलेला आहे. त्यापासून F या निष्कर्षाची स्थापना अशी होऊ शकते :-

| | | |
|---|---|---|
| १२. ( c · ∼ c ) | १०, ११ | संधि ( व्याघात ) |
| १३. c V e | १०, | विग्रह |
| १४. F | २, १३ | विधायक संघात |

— याचा उल्लेख अप्रत्यक्षसिद्धीच्या संदर्भात करावयास हवा.

शेवटी काही सूचना कराव्याशा वाटतात.

( १ ) आधुनिक तर्कशास्त्राच्या अभ्यासात भाषेच्या अभ्यासाचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. " तर्कदीपिके " च्या पहिल्या प्रकरणात एका विभागात तर्कशास्त्र व भाषा यांचे एक त्रोटक विवेचन आलेले आहे. " तर्कमंजरी " तील " तर्कशास्त्र व भाषा " हे प्रकरण उत्कृष्ट आहे. त्याप्रकारचे एक प्रकरण " तर्कदीपिके " त असणे आवश्यक आहे.

( २ ) नैगमनिक सिद्धता तर्ककठोर ( rigorous ) हवी. पण प्रस्तुत पुस्तकात ती तेवढ्या प्रमाणात आढळून येत नाही. उदा. पान १७३ वरील युक्तिवाद क्र. ३ पाहा. त्याची ५ वी पायरी ( ∼ p V ∼ q ) अशी आहे. सहावी पायरी q आहे. त्यावरून वैकल्पिक संवाक्याच्या नियमानुसार ∼ p ही सातवी पायरी निष्पादित केली आहे. या ठिकाणी झालेली चूक अशी : वै. सं. च्या नियमानुसार p V q , ∼ p / ∴ q या अनुमानाकारात दुसरे आधार-विधान नकारात्मक हवे. दिलेले अनुमान वरील आकारात येण्यासाठी q ≡ ∼ ∼ q ही सातवी पायरी द्विवार निषेधाच्या साहाय्याने मांडणे आवश्यक आहे. या नंतरच आधारविधानांतून ∼ p हा निष्कर्ष यथार्थपणे निघू शकतो असे म्हणता येईल, एरव्ही नाही. तसेच पान १६८ वर ३ री पायरी

$q \vee \sim p$ अशी आहे. तीपासून $\sim q \supset \sim p$ ही पायरी येण्यासाठी $\sim \sim q \vee \sim p$ ही पायरी (द्विवार निषेधाने येणारी) अगोदर मांडणे आवश्यक आहे. या संदर्भात सरलीकरणाच्या नियमासंबंधीदेखील केवळ डाव्या बाजूचे संयोज्यच वेगळे करता येणे शक्य आहे असे बंधन घालणे आवश्यक आहे.

(३) प्रस्तुत पुस्तकात बरेच मुद्रणदोष आहेत. त्यातील काही असे : पान १३१ वर $(p \vee q)$ चे सत्यताकोष्टक दिलेले आहे. त्यात $(p \vee q)$ या स्तंभातील q छापावयाचा तसाच राहून गेला आहे. पान १६८ वर स्थान-विपर्ययाच्या बाबतीत लिहिताना " $(p \cdot q)$ सत्य असेल तर $(p \cdot q)$ सत्य आहे" असे वाक्य आहे यात 'तर' नंतर $(p \cdot q)$ ऐवजी $(q \cdot p)$ हवे. पान १८७ वर '० चे लक्षण' असे छापले आहे. तेथे '०' ऐवजी '·' हवे. प्रबल विकल्प '$\neq$' असा चिन्हित केलेला आहे पण पान १३२ वर तो '$\neq$' असाही चिन्हित केलेला आढळतो. पान १७३ वर (आ) युक्तिवादात शेवटची पायरी (A.D) अशी असून तिचे समर्थन ३,५ विग्रह असे दिलेले आहे. तेथे 'विग्रहा ऐवजी 'संधी' हवे. पान १८० वर उदा० ३ मध्ये ६ वी पायरी $\sim(f v k)$ अशी आहे ती $\sim(\sim f v k)$ अशी हवी. पान ७३ शेवटच्या परिच्छेदात "A सत्य असेल तर I असत्य असते" या विधानात "…. तर I सत्य असते." असे हवे. पान ६५ वर 'द्विवार' व 'द्विविध' हे शब्द निषेधाच्या संदर्भात समानार्थी म्हणून वापरले आहेत. त्यापैकी "द्विविध निषेध" हा चुकीचा शब्द पूर्णपणे गाळून टाकावा. पान ४ वर "अनुमान व युक्तिवाद" असे शीर्षक छापलेलें आहे. ते "अनुमान किंवा युक्ति-वाद" असे असावे असे वाटते. "सुतर्कित" या क्लिष्ट शब्दाऐवजी "वैध" हा शब्द जास्त समर्पक वाटतो.

—श्री. य. देशपांडे

रेखा देशपांडे एम्. ए.

# अज्ञेय की कविता : एक मूल्यांकन

लेखक– चंद्रकांत महादेव बांदिवडेकर, प्रथम संस्करण १९७१
प्रकाशक : सरस्वती प्रेस, इलाहाबाद – १
पृष्ठ संख्या २१५ मूल्य– १२ रुपये.

छायावाद, रहस्यवाद ओहोटीला लागला असता, बच्चन-दिनकरचे स्वर मुखर होत असता आणि प्रगतीवादाची पताका फडकत असता अज्ञेयांनी हिंदी काव्य-क्षेत्रात एक नवे दालन उघडले– अंतर्मुख, आत्मपरीक्षणात्मक काव्याचे, मुक्त, स्वच्छंद रूपबंधाचे ! ही अंतर्मुखता छायावादी, रहस्यवादी कवींच्या जातीची नव्हती. बच्चनप्रमाणे 'स्व' च्या भोवतीच रुंजी घालीत फिरणारी स्वार्थवादी अंतर्मुखताही नव्हती. बाह्य जगताचा, जीवनाचा डोळस अनुभव – खोल अंतरंगात जाऊन अनुभव, चिंतन, भावना व बुद्धी यांच्या संगमाने एक रसायन तयार होत होते. आणि हिंदी कवितेला एक नवी भावभूमी, नवे रचना – शिल्प, नवी वैचारिक दृष्टी मिळाली. टीकाकारांनी कडाडून टीका केली. काहींना अज्ञेय दुरूह, दुर्बोध वाटले. अनेकांना 'अज्ञेय' म्हणजे एक कोडे वाटले. हे कोडे उलगडून दाखविण्याचा आपल्या परीने केलेला हा एक प्रयत्न. – डॉ. चंद्रकांत बांदिवडेकरांचे हे पुस्तक –'अज्ञेय की कविता– एक मूल्यांकन !'.

प्रथम खंडात अज्ञेयांच्या कवितेचा भावपक्ष विस्ताराने चर्चिलेला आहे. अज्ञेयांच्या कवितेच्या ढोबळ वैशिष्ट्यांनुसार त्यांचे वर्गीकरण करून त्या त्या वैशिष्ट्यांचे सांगोपांग विवेचन बांदिवडेकर करतात. पहिल्या प्रकरणात प्रकृति – काव्याचा विचार केलेला आहे. यातील विवेचित कविता विशेषेकरून कवीच्या प्रारंभिक कवि-जीवनातील होत. पुढे पुढे तो अधिकाधिक अंतर्मुख, आत्मस्थ होत जातो. दुसरे प्रकरण येते प्रेम-काव्यासंबंधी.

सुरुवातीच्या कालखंडांतील या कविता म्हणजे कवीच्या यौवनसुलभ प्रणय-भावनांची, निसर्गाविषयी तरुण कवि-मनाला स्वाभाविकपणे वाटणाऱ्या

अनुक्रमणिका




आकर्षणाची कोवळी अभिव्यक्ती आहे. त्यात प्रकृतीतून जीवनबोध व आत्म-बोधाचा प्रयत्न, प्रकृतीवर आपल्या भावभावनांचा आरोप व त्याद्वारे स्वतःच्या मनःस्थितीचे चित्रण करण्याचा प्रयत्न या साऱ्या गोष्टी दिसून येतात. अशा प्रकारचा प्राथमिक स्वरूपाचा प्रयत्न बच्चनमध्ये ही आढळतो. तरूण मनाला वाटणारे अनामिक व्यथेचे आकर्षण, हवीहवीशी वाटणारी हुरहूर विशेषतः व्यक्त झाली आहे.

'प्राणों में हाय पुरानी क्यों कसक जाग उठी सहसा ?'

या कवितांवर निस्संशय छायावादी काव्याचा प्रभाव पडलेला आहे व कवीची प्रारंभिक संस्कारक्षम अवस्था लक्षात घेता स्वाभाविकही आहे.

या कवितांच्या ओळी-ओळीत लपलेल्या कवीच्या संवेदनांना स्पर्श कर-ण्याचा, त्या उकलून, उलगडून दाखविण्याचा समालोचकाचा ('टीकाकार' शब्द मुद्दाम वापरीत नाही; बिचाऱ्याला पूर्वग्रहांनी फार ग्रासलेले आहे.) प्रयत्न स्तुत्य व सफलही आहे. कारण येथे टीका-ग्रंथ-समालोचना-वाचणारा देखील ग्रंथातील समालोचनेच्या सहाय्याने कवीच्या संवेदनांपर्यंत अलगत पोहोचू शकतो. आणि मला वाटते, समालोचनाचा एक महत्त्वाचा उद्देश येथेच सफल होतो. समालोचक स्वतः कवीच्या सूक्ष्म संवेदनांपर्यंत पोहोचण्याचा प्रयत्न करतो –कदाचित हा त्याच्या कवि-भक्तीतून, अज्ञेयांविषयी वाटणाऱ्या आत्यंतिक आस्थेतूनही स्फुरला असेल.

त्यासाठी बारीक सारीक तपशील, विवरणे दिली आहेत. विशिष्ट शब्दांच्या प्रयोगाने साधलेली सौन्दर्यनिर्मिती अभ्यासकाच्या दृष्टीला दाखवून देण्यासाठी इतक्या सूक्ष्म विवरणाची गरज भासतेच. उदा० पृष्ठ २० वर 'धूप' कवितेतील 'कुरर, 'अकेला' इत्यादी शब्दांच्या पारदर्शिकतेचे घडवलेले दर्शन !

कवितेच्या टीकेत कित्येकवेळा समालोचक प्रसंगानुरूप मोहक शैलीचा वापर करतो ( काही ठिकाणी तो तेवढाच रूक्षही झालेला आहे, हेही लक्षात असू द्यावे. ) पहिल्याच प्रकरणातील उदा० द्यावयाचे झाले तर –

"'.....हरियाली का यह रूप रसिक के मानस पर उजली धूप में बालों को सुखानेवाली सद्यःस्नाता का रूप जिवंत कर जाता है. अज्ञेयने इस दृश्य को विस्तृत संदर्भ में प्रतिष्ठित करते हुए सम्यकता प्रदान की है. मतवाली हरियाली का यह रूपपरिवर्तन देखकर कीरों के झुंड फब्तियां कसते मंडराते हैं और कहीं प्रांतर में लजीली शेफाली इस खुले श्रृंगार को देख लज्जित होकर चुपचाप झर रही है"

"....प्रेम की उदात्तता की अभिव्यंजना करनेवाले अज्ञेय का पौरुषवान कवि वासना के प्रति भी बेझिझक स्वीकार भाव रखता है–" अशा प्रकारे जाता जाता, कवितेचे विवेचन करता करता कवीच्या व्यक्तिमत्वाची झलक पुस्तकभर ठायी ठायी आढळत राहील. याशिवाय घोर बुद्धिवादी म्हणून म्हटल्या गेलेल्या अज्ञेयांच्या प्रकृतिप्रेमाचा, रागात्मकतेचा प्रत्यय ते आणून देतात.

'अज्ञेय हा छायावाद व प्रयोगवाद यांना जोडणारा दुवा होय'– हा निष्कर्ष मांडताना अज्ञेयांच्या 'टेसू' कवितेचे सुंदर विवेचन त्यांनी प्रस्तुत केले आहे. या व अशांसारख्या विवेचनातून समालोचकातला एक चांगला, तळमळीचा अध्यापक डोकावतो यात संशय नाही.

अज्ञेयांची प्रेम-कविता चर्चिताना अज्ञेयांना सर्वथा मौलिक, स्वतंत्र दर्शविण्याचा फुकाचा, निष्फळ प्रयत्न नाही. मैथिलीशरण गुप्त ते बच्चनपर्यंतच्या सर्व विविध प्रभावांचा उल्लेख सोदाहरण केला आहे.

'मिलन-रजनी हो चुकी, विच्छेद का अब है सवेरा'

– विशिष्ट लय, शब्दांची निवड, काव्यपंक्तीची ठेवण इत्यादींवर बच्चनचा केवढा प्रभाव पडला आहे हे वेगळे विशद करून सांगायला नको. फरक एक – अगदी सूक्ष्म – बच्चनसारखा विशुद्ध भावुक कवी 'पूछ लूं मैं नाम तेरा' सारखे विधान करताना दिसणार नाही. तो विरहाच्या कल्पनेने व्याकुळ होईल. मीलनात तो जितका बेपर्वा होतो.

( उदा० – हम नहीं अपराध कोई कर रहे हैं
सृष्टि की एक मांग पूरी हो रही है )

तितकाच तो विरहात व्याकुळ, अगतिक होतो. स्मृतींनी बेजार होतो –

" मुझ से मिलने को कौन विकल,
मैं होऊं किस के हित चंचल,"
यह प्रश्न शिथिल करता पग को,
भरता उरमें विह्वलाप है"

पण अज्ञेय,

– या अगतिकतेचा, विह्वलतेचा, लवलेशही त्यांच्यात नाही. मीलनसुख उपभोगल्यानंतर विरहाचे घटिका जवळ येत असताही बेपर्वा दिसतात –

'तू सदय है, किंतु तुझको और भी तो काम होगा
प्यार का साथी बनाथा, विघ्न बनने तक रुकूं क्यों ?'

– ही कवीच्या प्रेम–विषयक दृष्टिकोणाची एक झलक !

यानंतर कवीच्या प्रेम-विषयक विचारांचे विस्तृत विवेचन– त्यातही प्रेम-विषयक विचारांच्या विकासाचा, त्यांत उत्तरोत्तर येत गेलेल्या परिवर्तनाचा ते आढावा घेतात. सुरुवातीला अज्ञेयांवर जरी छायावादी कवींचा, बच्चन वगैरेंचा प्रभाव पडला असला तरी नंतर त्यांचे असे एक स्वतंत्र प्रेमविषयक तत्त्वज्ञान विकसित होते. ' नाम तेरा ' ' माहीवाल से ' वगैरे मध्ये तर निर्भीड, बौद्धिकतावादी व भौतिकतावादी विचारांचा पगडा कवीवर बसलेला दिसून येतो. इथेच त्याच्या समाजाच्या रूढ कल्पनांहून जरा दूरची, न मळलेली वाट चोखाळण्याची, क्रांतीची पावले टाकण्याची प्रवृत्ती प्रभावी बनू लागते. मग समाज-व्यवस्थेविषयी काळजी वाटून घेणाऱ्यांना हा बेजबाबदारपणा वाटला तरी बेहत्तर ! त्याचबरोबर या बौद्धिक क्रांतिकारी प्रतिपादनात भावनाशील-तेला तडा गेलेला आहे भासत नाही. तर्क व बुद्धी यांशी प्रामाणिक राहून भाव-नेशी देखील राहता येईल तितके प्रामाणिक राहण्याचा कवीचा प्रयत्न दिसून येतो. विषयांतर वाटेल पण सांगण्याचा उद्देश समालोचकाच्या बारकाव्यात शिरण्याच्या क्षमतेकडे लक्ष वेधण्याचा आहे. समालोचकाने हे सारे बारकावे निरखून पाहून मांडले आहेत व त्यायोगे अज्ञेयांच्या प्रेमकाव्याचा एक नितांत सुंदर, वैशिष्टपूर्ण पैलू प्रकाशित केला आहे – त्या बरोबरच कवीच्या व्यक्ति-मत्वाचा पैलू देखील.

' अज्ञेय ने प्रेयसी का रूप-चित्रण नहीं किया है, भावचित्रण अधिक ' सारख्या छोट्या विधानातून ते कवीच्या संवेदनांची सूक्ष्मता व त्या सूक्ष्मतेला अचूक पकडणाऱ्या शैलीची सखोलता, यांकडे सहज निर्देश करून जातात.

## काव्यविषयक चिंतन

हिंदी काव्यातील दोन वेगवेगळ्या प्रवृत्तींच्या सीमारेषेवर उभ्या अस-लेल्या अथवा एका नव्या काव्य-प्रणालीचा प्रवर्तक म्हणून महत्त्व पावलेल्या एका बुद्धिवादी कवीच्या काव्यतेविषयक मान्यतांविषयी जिज्ञासा साहजिकच असणार. सुदैवाने अज्ञेयांच्या काव्यविषयक विचारांना अभिव्यक्ती मिळाली आहे त्यांच्या काव्यातच. त्यासाठी त्यांना वेगळे गद्यग्रंथ लिहीत बसावे लागलेले नाही आणि त्या कवितांच्या मंथनातून कवीच्या काव्यविषयक चिंतनाचे नवनीत काढून देऊन अभ्यासकाला उपलब्ध करून दिले आहे या प्रकरणात !

या प्रकरणात सर्वात अधिक महत्त्वाची चर्चा होते अज्ञेयांच्या आस्था, विश्वासासंबंधी. एका नव्या वादाचा सूत्रपात करून देणाऱ्या या कवीत जशी दृढ आस्था आढळून येते – बुद्धिवादाच्या रसायनाने अधिकच कठीण बनलेली

आस्था जशी आढळून येते– तशी भावनांच्या सागरलहरींहवर गटंगळचा खाणाऱ्या श्रद्धा, प्रेम, निष्ठांचे सदैव कौतुक करीत राहणाऱ्या कवीतही आढळीवयाचा नाही. उदा.

“अभी न हारो अच्छी आत्मा
अभी मैं हूं,
तुम हो,
और अभी मेरी आस्था है.”

अथवा,

‘जिस दिन तुमने कहा
विवेक तो नाम है श्रद्धाके अस्वीकार का,
उस दिन तुम दास हुए तर्कना के
विवेक तुम्हारा सो गया’

समालोचकाच्या मते अज्ञेयांच्या जीवनाची सार्थकता त्यांच्या काव्य-सृजनात आहे; त्यांचे जीवनविषयक तत्त्वज्ञान त्यांच्या काव्य-सृजनांशी अनिवार्यतया जोडले गेलेले आहे; त्यामुळेच त्यांची कविता उत्तरोत्तर अधिकाधिक तीव्र, प्रगल्भ होत जाते.

## आत्मान्वेषण, जीवन–दृष्टिकोण

एखाद्या कवीच्या नशीबी टीकाकारांची कडू टीकाच जास्त प्रमाणात येते. त्याच्या काव्याकडे पाहताना त्याच्या वैयक्तिक जीवनात डोकावण्याचा आटोकाट प्रयत्न केला जातो. कवीच्या कलाकृतीच्या अभ्यासासाठी त्याचे व्यक्तिमत्व व व्यक्तिगत जीवन अभ्यासले जाण्यात वावगेही नाही. पण एकाद्या कवीच्या नशीबी त्याचे व्यक्तिगत जीवन अभ्यासता अभ्यासता, त्या जीवनाची कडू जहर टीका येऊ लागते. या अतिवादी प्रवृत्तीचा, परिणाम त्यांच्या काव्याच्या टीकेवर झाल्याशिवाय रहात नाही. दुर्दैवाने अज्ञेयांच्या वाटचाला हेच आले. बांदिवडेकरांनी कवीच्या या दुर्दैवाचा वेध घेतलेला दिसतो. आणि त्यामुळेच कदाचित अधिकाधिक सहानुभूतीचा प्रवाह वाहू लागतो. त्यातून ते कवीला ठीक उलटया दिशेला नेण्याचा प्रयत्न करतात. त्यांच्यातील ‘धनात्मक’ तथ्यांचे प्रकटन करू लागतात.

## अज्ञेयांच्या कवितेतील रहस्यवाद

(अज्ञेयकी कविता में रहस्यवाद)

हाच प्रयत्न पुढच्या प्रकरणातही–किंबहुना संपूर्ण ग्रंथात–दिसून येतो. कवीच्या व्यक्तिमत्वातील उपेक्षित पैलूंवर प्रकाश टाकण्यासाठी बांदिवडेकरांनी

कंबर कसलेली दिसते. त्यामुळे अज्ञेयांच्या कवितेपेक्षाही अधिक लक्ष 'व्यक्ति अज्ञेय' याकडे वळलेले दिसते. समालोचक अज्ञेयांच्या कवितेतून व्यक्तिमत्वात शिरतात आणि अभ्यासक त्याला उमगलेल्या व्यक्तिमत्वाच्या भिंगातून कविता समजून घेऊ लागतो.

अज्ञेयांविषयीच्या अनेकानेक गैरसमजांची, पूर्वग्रहांची कारणेही ते ( समालोचक ) अभ्यासतात ! "पूरे सूट-बूट में रहनेवाला व्यक्ति ईश्वर में आस्थाशील हो सकता है, यह सामान्य भारतीय पाठक के लिए अविश्वसनीय है."

"अधिक प्रतिष्ठित स्तर पर यह कठिनाई अज्ञेयके एक समय के आलोचकों के कारण भी हो गई है, क्यों कि घोर व्यक्तिवादी, मनोविज्ञानवादी, अभारतीय, इत्यादी लेबल लगाकर की गई आलोचना बाद में विश्वविद्यालयीन स्तर पर इतनी प्रचलित हुई कि अज्ञेय की कविता की निरंतर विकासशीलता की और ध्यान कम गया." ( पृष्ट ८२ ).

पण हे अज्ञेयांमधील परिवर्तन बांदिवडेकरांना स्वाभाविक वाटते. आणि ते व्यक्तिवाद, मनोविज्ञानवाद, विदेशी प्रभाव इत्यादी आरोपांनी बरबटलेल्या कवीच्या व्यक्तित्वाच्या अंतरंगात डोकावून त्यातील निर्मळ आस्था, आस्तिक्यबुद्धी आणि रहस्यवादिता यांचे दर्शन घेण्याचा व घडविण्याचा प्रयत्न करतात.

परंपरा-पालनाच्या रूपाने सुरू केलेल्या अज्ञेयांच्या रहस्यवादी प्रवृत्तीचे एक वैशिष्टय ते निदर्शनास आणून देतात. ही रहस्यवादी वृत्ती कोणत्याही प्रकारे हताशा, निराशा व frustration मधून न उद्भवता अधिकच दीप्त झालेल्या 'अहं' मधून, व्यक्तिवादातूनच स्फुरित होते.

" गुरू ! मैं तुझ से सीखूं पर अक्षुण्ण रखूं अपना विश्वास ||
बुझकर नहीं, दीप्त रहकर ही मैं आ पाऊं तेरे पास ।

या विषयामुळे समालोचकाला त्याचा रहस्यवाद हा सोयिस्कर मुखवटा वाटत नाही.

बाह्य जीवन व जगताच्या विकृती, त्याची कुरूपता यांकडे कवी काणाडोळा करीत नाही. तोच तर मुळात त्याच्या प्रयोगवादी प्रवृत्तीचा पाया आहे. पण त्याचबरोबर या कुरूपतेतच सर्वस्वी बुडून जाऊन स्वतःची दृष्टीच विकृत करून घेण्याचा आधुनिक वेडेपणाही त्याला शिवलेला नाही.

अज्ञेय हे आस्थाहीन नवकवितेपासून तर दूर आहेतच, पण त्याचबरोबर त्यांचा रहस्यवादही कोणत्याही प्रकारच्या frustration मधून उद्भवलेला

नाही. आणि केवळ परंपरापालनाचा प्रकार बनून राहण्याचा दिखाऊपणाही त्यात नाही. तर तो सर्वथा बुद्धिसम्मत असाच आहे. – हे सिद्ध करताना समालोचक कवीला एका सुवर्णमध्यावर आणून बसवतात. अज्ञेयांची आस्था ही बुद्धीच्या भक्कम पायावर उभी आहे.

'मत छुओ, रोको, पुकारो मत मुझे,
जहां मैं हूं, वहां से मत उतारो –
मुझे कुछ मत कहो –
– अगर हां, कांपे अगर डग तो
तुम्हीं, और तुम, तुम्हीं – तुम रहो
जो हाथ मेरा गहो।'

अज्ञेयांच्या रहस्यवादाचा विचार करताना इतर रहस्यवादी कवींशी त्याची तुलना होणे अगदी साहजिक आहे. बांदिवडेकर यांची महादेवी वर्माच्या रहस्यवादाशी तुलना करतात. त्यांना महादेवींच्या व्यक्तिमत्वात तितकेसे प्रौढत्व आढळत नाही. त्यांच्या कवितेचा विकास एकमार्गी व सीमित आहे हे मान्य ( अर्थात त्यांच्या व्यक्तिमत्वाच्या दुसऱ्या पक्षाचा समर्थ आविष्कार त्यांच्या गद्यातून आलेला आहेच ). या विरुद्ध अज्ञेयांच्या कवितेचा विकास बहुमुखी; विविध अनुभतींचे धुमारे त्यांच्या व्यक्तिमत्त्वाला फुटलेले! पण अशी तुलना करताना दोन्ही कवींच्या भिन्न भिन्न पार्श्वभूमी लक्षात घेण्यास ते का विसरले कळत नाही. प्रसाद त्यांना का नाही आठवले? बौद्धिक व भावनिक दृष्टचा अज्ञेयांच्या बरेच जवळचे वाटणारे निराला त्यांना का नाही आठवले?

## अज्ञेयांच्या कवितेतील समाज-संपृक्ती

( अज्ञेयकी कविता में समाज-संपृक्ति का बोध )

कित्येक वेळा समालोचकाची अज्ञेय-भक्ती अज्ञेयांच्या समर्थनासाठी तर्क प्रस्तुत करण्याची पराकाष्ठा करतानाही दिसते अगदी ओढून ताणून! अज्ञेयांवर लावण्यात आलेला 'व्यक्तिवादी असण्याचा' आरोप धुऊन काढण्यासाठी तो तर्क देतो की अंतर्मुख असणे हे अनिवार्यपणे व्यक्तिवादी असण्याचे लक्षण नसून तो तर प्रौढ, परिपक्व व्यक्तिमत्वाच्या चिंतनशील प्रवृत्तीचा परिणाम होय!

समाजाद्वारे व्यक्तीच्या मार्गात आणले जाणारे अवरोध व त्यांच्या विरुद्ध निषेध– 'व्यक्तिवादी व्यक्तीच्या शाश्वत आक्रोशाची अभिव्यक्ति आहे. समा-

लोचकाला यातही अज्ञेयांची ' न मळलेली वाट ' आक्रमिण्याची तळमळ दिसून येते (?) युद्धभूमीवर निघालेल्या सैनिकाला अश्रू गाळून घेण्याच्या आग्रहात मात्र ही तळमळ अवश्य दिसून येते .

व्यक्तीच्या एकाकी सामर्थ्याकडे लक्ष वेधून समालोचक कवीच्या समाज-संपृक्त व्यक्तिवादाचा पुरस्कार अवश्य करतो– ' सभी सर्जनात्मक कार्य व्यक्तिके माध्यमसे ही संभव होते है । '

याच प्रकरणात अज्ञेयांच्या राष्ट्रीय कवितांचा विचार अपरिहार्यपणे येतो. म्हणजे अज्ञेयांच्या आणखी एका उपेक्षित कोपऱ्यावर प्रकाशझोत . काही वेळा मात्र समालोचक अज्ञेयांचे समर्थन करावयाला जाताना अतिवादी प्रवृत्तीचा परिचय देतात हे येथेही जाणवते .

अज्ञेयांच्या काव्याच्या कलापक्षाचा विचार करताना बिंब–योजना, प्रतीक–योजना व संरचना यांना विशेष महत्त्व दिले आहे . अज्ञेयांच्या भाषा-विशेषांसंबंधी उल्लेख यत्रतत्र सहजच जे आले आहेत तेवढेच.

या प्रकरणातूनही कवीच्या व्यक्तिमत्वाचा मागोवा घेण्याचा ध्यास प्रकर्षाने जाणवतो. बिंब–सृष्टीसाठी उपयोगात आणलेल्या विविध साधनांद्वारे कवी–व्यक्तिमत्वाचे स्वरूप समजून देण्याचा प्रयत्न आहे .

प्रारंभीच्या कवितांमध्ये ज्याप्रमाणे शैली, विषय, अलंकरण इत्यादींच्या बाबतीत परावलंबित्व दिसून येते, त्याप्रमाणे बिंब–योजनेतही. बिंब–सृष्टीत पुढे आढळून येणारी स्वतंत्रता, व्यापकता व साहस यांचा अभावच प्रामुख्याने प्रारंभिक कवितात दिसतो. तरी पण ' बिंबात्मकता ' –ती देखील सजीव–हे त्यांच्या काव्याचे एक प्रमुख वैशिष्टच ! ' घास '– ' हिरवळ ' हे बिंब तर त्यांच्या काव्यात अधिकच सहज–सुंदरतेने, सजीवतेने उठून दिसते. इतका सुंदर, सखोल, अर्थपूर्ण प्रयोग ' हिरवळी ' च्या बिंबाचा इतरत्र झालेला दिसून येत नाही. अशावेळी अज्ञेय परंपरांचे धागे तटातट तोडून मुक्त आकाशात स्वैर, उंच भरारी घेतात. त्यांच्या बिंब–प्रतीकांत कमलनालापासून बाजरीच्या तुऱ्यापर्यंत–परंपरेपासून अपरंपरेपर्यंतचा स्वैर संचार आढळतो. हिंदी काव्य-क्षत्रात अज्ञेयांची कविता हा एक मैलाचा दगड समजला जातो– त्याच्या अनेक कारणात हे एक कारण ! पण या साऱ्या वैशिष्टचपूर्णतेला बांदिवडे-करांनी गुंडाळले एका वाक्यात– ' अज्ञेय ने पहली बार घास का अधिक

मौलिक रूपमें प्रयोग किया है '– इतर मुद्दे ऐसपैस विस्ताराने मांडणाऱ्या आलोचकाकडून या इवल्याशा पण महत्त्वाच्या मुद्याचे विवेचन मला अधिक विस्ताराने अपेक्षित होते.

## गुणात्मक बिंब

अज्ञेयांना अधिक खोलवर, सूक्ष्मतेने जाणून घेताना समालोचकाने स्वतःच्या विचारांना दिलेली अभिनव दिशा– रंग बिंब, श्रव्य बिंब, गंध बिंब, स्पृश्य बिंब, रस-बिंब अशा सूक्ष्म वर्गीकरणानंतर प्रत्येकाचे सूक्ष्म विश्लेषण !

## अज्ञेयांच्या कवितेतील प्रतीक- योजना

( अज्ञेयकी कविता में प्रतीक-विधान )

अज्ञेयांच्या बिंब– योजनेची सांगोपांग चर्चा केल्यानंतर त्यांच्या प्रतीक –योजनेला हात घालण्यात औचित्य दाखविले आहे निःसंशय. कारण येथे अज्ञेयांच्या बिंबांची व प्रतीकांची जवळीक प्रत्ययास येते. त्यांच्या प्रतीक–योजनेतूनही एक संपूर्ण, सजीव बिंब बनून जाते व त्यामुळे प्रतीकाआड लपलेला अर्थ जरी सापडला नाही, तरी कवितेच्या गमतीपासून विन्मुख व्हावे लागत नाही.

बिंब व प्रतीक ही केवळ शैलीची वैशिष्टचे नसून ती अज्ञेयांच्या अनुभूती–विश्वाशी जुळलेली आहेत याचाही प्रत्यय समालोचक मनोज्ञपणे आणून देतो.

## संरचनेचे विश्लेषण

संरचनेच्या विश्लेषणात शैलीच्या इतर स्थूल, सूक्ष्म छटांचे विश्लेषण येते. उदा० संवाद–तत्त्व, प्रश्नाकुलता, संरचनेच्या घटक रूपात प्रकृतीचा वापर, संघटन– अन्विती, लय, विरोधी भूमिकांची बांधणी, व्यंग–विडंबनादि सूक्ष्म छटांचे विश्लेषण करताना समालोचक कवीच्या व्यक्तिमत्वाचे उद्घाटन करण्याचे विसरत नाही। किंबहुना हे सारे शैली–विशेष कवीच्या विशिष्ट व्यक्तिमत्वाचेच सूक्ष्म परिणाम होत. त्याच्या प्रश्नात्मकतेत त्याचा प्रखर बुद्धीवाद, गद्याच्या जवळ असणाऱ्या मुक्त–छंद नवकवितेतील लय ही कवीच्या चिंतनशील व्यक्तिमत्वातून पाझरणाऱ्या भावनाशीलतेची आर्द्रता जाणवते. अन्विती येते ती तर्कशुद्ध मांडणीने– तर्कशुद्धता बुद्धितत्त्वाच्या धारेमुळे. अज्ञेयांचे समर्थन करण्यासाठी समालोचक तर्क देतो–" तर्क चिंतनाचा परिणाम होय व चिंतन

हे भावानुभूतीच्या अग्नीतून तावून सुलाखून प्रखर बनलेले असे असते." व्यंग–विडंबनात्मक शैलीतूनही त्यांचा बुद्धिवादच डोकावतो. उदा०–' साहीवाल से '

अज्ञेयांच्या कवितेतील प्रमुख वैशिष्टयांचे सविस्तर विवेचन झाल्यानंतर त्यांच्या रचना–वैशिष्टयांचा घेतलेला हा सूक्ष्म आढावा– अर्थात समालोचकाच्या सखोल अभ्यासाचे, सूक्ष्मदर्शितेचे द्योतक !

## अज्ञेयांची कविता : स्वरूप व मूल्यांकन

भारतेंदु, द्विवेदी–युगापासून ते दिनकर–बच्चन पर्यंतच्या, इतकेच नव्हे तर भक्तिकालीन कबीर इत्यादी कवींच्या काव्य–वैशिष्ट्यांचा समाहार अज्ञेयांमध्ये आणून दाखविण्याचा समालोचकाचा प्रयत्न मात्र ओढाताणीचा वाटतो. याच्याही पुढे जाऊन तो म्हणतो की पूर्ववर्ती कवींच्या एकांगी उत्तमतेचा अथवा उत्कृष्ठतेचा समाहार अज्ञेयांच्या काव्यात झाला आहे. कदाचित त्यामुळेच अनेक प्रकारच्या सीमा असूनही अज्ञेयांचे काव्य शाश्वत प्रभाव उत्पन्न करू शकले आणि ते काल–प्रवाहात अधिक टिकेलही. अज्ञेयांच्या काव्याचा प्रभाव बुड-बुडयाप्रमाणे अस्थायी नाही हे कबूल. काल–प्रवाहात तग धरून रहाण्याच्या शक्तीचा परिचयही त्याने दिलेला आहे, पण येथे समालोचक अज्ञेय–काव्याच्या या वैशिष्ट्याचा उल्लेख करताना त्यांची तुलना समकालीन कवींशी करतात की या पूर्वसूरींशी, हे स्पष्ट करीत नाहीत.

'पुस्तकात उद्धरणे फार आहेत; कविताच्या कविता उतरविलेल्या आहेत '–असा आरोप काहीजण करतील. मला तरी तो आरोपच गैरवाजवी वाटतो. कारण भरपूर प्रमाणात उदाहरणे दिल्याने केवळ समर्थनबाजीचा अथवा विधानांमागून विधाने करीत जाण्याचा कोरडेपणा भासत नाही. अभ्यासलेल्या संदर्भग्रंथांतून पाश्चात्य गिल्बर्ट मरेपासून मराठी विंदा करंदीकरांपर्यंतची उद्धरणे जरूर आहेत; पण त्यांचा जरूरीपेक्षा जास्त उपयोग सरळ सरळ टाळला आहे, हे पाहून बरे वाटले एरवी एकादा टीकाग्रंथ उघडला तर लेखकाच्या स्वतंत्र चिंतनाऐवजी तो ग्रंथ म्हणजे संदर्भग्रंथातून दिलेल्या संदर्भांशांचाच एक मोठासा संग्रह वाटू लागतो. ही प्रवृत्ती येथे नाही.

शब्द मात्र काही ठिकाणी फार बोजड वापरलेले दिसतात. स्मरणोज्जीवित, दुष्परिवर्तनशील ( rigid ), समायोजन ( adjust ) सारखे शब्द गाळता नसते का आले ? शेवटी त्या हिंदी शब्दाचा इंग्रजी प्रतिशब्द कंसात द्यावा लागावा–ही नामुष्की का म्हणून पत्करावी ?

......तर या काही गोष्टी - चांगल्या वाईट, भल्या बुऱ्या जशा जाणवल्या तशा लिहिल्या, बांदिवडेकरांच्या या 'कवी अज्ञेय' च्या सूक्ष्म अध्ययनाचे एक स्थूल अध्ययन माझ्याकडून ! एकंदरीत प्रभाव म्हणाल तर, ज्याला समजावून देण्याचा प्रयत्न करायला भले भले डरतात आणि ज्याच्यावर चिखलाचे शिंतोडे उडविण्यातच आत्तापर्यंत बहुतेक टीकाकारांनी आपल्या लेखणीचे सार्थक मानले अशा एका कवीच्या व्यक्तिमत्वाला ( प्रामुख्याने )– त्याच्या कवितेतून घेण्याचा व जाणवून देण्याचा हा प्रामाणिक प्रयत्न. तटस्थ अशासाठी नाही की, व्यक्तीला तटस्थ राहणेही कठीण; आणि एकाद्याच्या प्रेमात पडल्यावर त्याहून कठीण. बांदिवडेकर बऱ्याच अंशी अज्ञेयांच्या प्रेमात पडलेले आढळून येतात. ( आणि त्याच क्षणी अज्ञेयांना एक रसिक समालोचक लाभतो. ) म्हणूनच मला असे वाटते की हा प्रयत्न तटस्थ नसला तरी प्रामाणिक आहे, रसिक आहे. स्वतःच्या भावनेशी व चिंतनाशी सर्वथा प्रामाणिक राहून दर्शविलेला हा 'अज्ञेय' होय ! अज्ञेयांच्या अभ्यासकाला आणि विशेषत: विश्वविद्यालयीन साहित्याच्या विद्यार्थ्यांत या ग्रंथांचे अधिकाधिक स्वागत होत राहील ही शुभाकांक्षा !




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

# अन्नाची नासाडी करुन पैशाचा कचरा करु नका



अन्न वाया घालविणे म्हणजे हजारो लोकांचे अन्न तोडणे होय

अन्न वाया घालविणे हा नैतिक अपराध आहे!

• महाराष्ट्र शासन माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, सचिवालय मुंबई-४०००३२.